सत्कार्योत्तेजक सभा-धुळें

# श्री ज्ञानेश्वरीदर्शन

लेखक

शिवाजी नरहर भावे

सत्याग्रहाश्रम वर्धा

किंमत [illegible] रुपये

( श्री रामदास आणि रामदासी मासिकांत प्रसिद्ध झालेला )

सत्कार्योत्तेजक धुळें

श्री

महाराष्ट्रधर्म ग्रंथमाला

ग्रंथ सहावा

# श्री ज्ञानेश्वरीदर्शन

तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेंसीं विश्व भरूं ।
आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥ ( १३·११६० )
फिटो विवेकाची वाणी । हो कानां मनां जिणीं ।
देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ( १३·११६१ )
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोध सुकाळा — । माजीं विश्व ॥ ( १३·११६२ )

---

लेखक शिवाजी नरहर भावे- सत्याग्रहाश्रम वर्धा

फेब्रुवारी १९५३

किंमत-20 रु.

# अनुक्रमणिका





# श्री ज्ञानेश्वरी शब्दार्थ कोश

रचयिता

शिवाजी नरहर भावे

मूल्य २५ रूपये

प्रकाशक मंत्री, ग्रामसेवा मंडळ,

गोपुरी, वर्धा

# प्रस्तावना

१ श्रीज्ञानेश्वरमहाराज आणि ज्ञानेश्वरी या दोन शद्बांचा उच्चार केल्याबरोबर, प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या अंतःकरणांत, एका अपूर्व, एका दिव्य आणि पावन भावनेचा उदय होत असतो. ही भावना केवळ क्षणिक स्वरूपाची नसून शतकानुशतकें महाराष्ट्राच्या अंतःकरणावर खोल ठसलेली आहे आणि उत्तरोत्तर ती वाढत आहे. नाथ तुकोबा-सारख्या संतसत्पुरुषांना हि या भावनेनें आपण धन्य झालों असें वाटतें तेथें इतर सामान्य लोकांची काय कथा ! महाराष्ट्रांतलें लाखो लोक ज्ञानेश्वरांच्या अप्रत्यक्ष संगतीनें आणि ज्ञानेश्वरीच्या केवळ अल्प श्रव-णानें पावन होत आलेले आहेत. हजारो लोकांना ज्ञानेश्वरांच्या नांवानें आणि ज्ञानेश्वरीच्या ओव्यांनीं शांति मिळत आलेली आहे. ही जी विलक्षण जादू आहे, तिचें रहस्य शब्दातीत अशा अनंत साधन-प्रक्रियेंत दडलेलें आहे.

२ हजारो जन्मांची साधना ज्ञानेश्वरीच्या पाठीमागें उभी आहे. भगवान् बुद्धांच्या जातककथा लिहून त्यांच्या साधनेच्या पूर्वेतिहासाचें एक मोठे मधुर काव्य बनविण्यांत आलें आहे. ज्ञानेश्वरांच्या साधनेचें ज्ञानेश्वरी हें असें च एक अद्भुत काव्य बनलें आहे. स्वतः महाराज म्हणतात —

> माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प
> तया फळाचें हे महाद्वीप । पातली प्रभु ॥ १६·३२ ॥
> पुण्यें पोशिली असाधारणें । तियें तुझे गुण वानणें
> देऊनि मज उत्तीर्णें । जालीं आजि ॥ १६·३३ ॥

सत्यवाणीचें तप आणि अलौकिक पुण्यें महाराजांनीं अनेक कल्पें केल्याची त्यांची भावना येथें व्यक्त झाली आहे. पूर्वजन्म पुनर्जन्म जरी कोणी न मानला तरी ज्ञानेश्वरीच्या पाठीमागें हजारो जन्मांनीं च सिद्ध होऊं शकेल अशी असामान्य सिद्धि आहे, एवढें निःशंकपणें कबूल करावें लागेल.

३ ज्ञानेश्वरी ही दिव्य भव्य आणि पावन अशा अनंत ज्ञान-गुणांच्या साधनेची सिद्धि असल्यामुळें

अन्या जगद्धितमयी मनसः प्रवृत्तिः

अन्यैव कापि रचना वचनावलीनाम्

ही जगन्नाथरायांची उक्ति तिच्या ठिकाणीं मूर्तिमंत झालेली आढळून येते.

तीर्थोदकं च वह्निश्च नान्यतः शुद्धिमर्हति ' अशी ज्ञानेश्वर आणि त्यांच्या सर्व च भावंडांची स्थिति असून, ज्ञानेश्वर महाराज समाजापुढें शुद्धिप्रकरणनिमित्तानें गेले ते समाजाच्या शुद्धीच्या आणि समाजाच्या कल्याणाच्या इच्छेनें समाजाशीं या निमित्तानें संबंध यावा एवढ्या च कारणानें गेले, यांत तिळमात्र शंका नाहीं.

४ ज्ञानेश्वरांच्या आईवाडिलांनीं निःशंकपणें प्रयागतीर्थांत जलसमाधि घेतली. ती सुद्धां आपल्या अशुद्ध मुलांना परमशुद्ध समाजानें आपणांत मिळवून घ्यावें. या हेतूनें नव्हे, तर आपल्या मुलांचें ज्ञानधन समाजाशीं संपर्क येऊन समाजाला मिळावें, या च हेतूनें. आपण देहांतप्रायश्चित्त घेतल्यानें आपल्या मुलांचा समाजाशीं ज्ञानसंबंध जोडला जाईल, ही त्यांची कल्पना होती. पण ती खोटी ठरली.

५ शेवटीं पैठणला ज्ञानेश्वरांसह निवृत्तिनाथादि चारी भावंडें गेलीं. आणि मोठमोठ्या अहंमन्य पंडितांचें वेदपठन हें सरासरी रेड्याच्या ओरडण्याच्या किंमतीचें च आहे, हें तेथें त्यांच्या संगतीनें लोकांच्या चांगलें लक्षांत आलें. रेडा बोलविला तो प्रकार हाच.

He came, He saw and He Conquered ही गोष्ट तेथें प्रत्ययाला आली. निवृत्तिज्ञानेश्वरादींच्या नुसत्या दृष्टिपातानें समाजहृदय जिंकलें गेलें. त्यांची सत्यनिष्ठा, त्यांची विनम्रता त्यांची शालीनता, त्यांचें मार्दव,त्यांचें माधुर्य, त्यांची कळकळ, दैवी संप-

संतांचा आणि ज्ञानगुणांचा त्यांच्या ठिकाणीं मुरलेला परिपाक — हें सर्व पाहून लोकांची भावना एकदम पालटली. ज्यांच्या सावलीला हि लोक अशुभ मानीत, ते च ज्ञानेश्वर, लोकांची माउली बनले ! पश्चात्तापानें लोकहृदय जळूं लागलें !

ज्ञानेशो भगवान् विष्णुः निवृत्तिर्भगवान् हरः

सोपानो भगवान ब्रह्मा मुक्ताख्या ब्रह्मणः कळा ॥

लोकांची अशी पश्चात्तापदग्ध भावना बनून गेली !

६ परंतु ज्ञानेश्वरांनीं सबंद ज्ञानेश्वरींत लोकांच्या गैरवर्तनाचा यत्किंचित्हि उल्लेख केला नाहीं नाहीं म्हणण्याला भक्ताच्या लक्षणांत अस्पष्टपणें किंचित् उल्लेख आल्यासारखा भासतो.

तेवि उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे

आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोक ॥ १२·१६६ ॥

पण तो आभास च ! — इतकी ज्ञानमय आणि अलिप्तवृत्ति निवृत्ति ज्ञानदेवादिकांची होती, यांत अद्वैततत्त्वज्ञानाची परमसिद्धि दिसून येते. शंकराचार्यांचें अद्वैततत्त्वज्ञानाचें बीज ज्ञानेश्वरस्वरूपानें पूर्ण फळाला आलें !

७ त्या फळाचा रस शके १२१२ मध्यें ज्ञानेश्वरीच्या रूपानें महाराष्ट्राला चाखण्याला मिळाला. नेवाशाला सद्गुरु आणि संतसज्जनांच्या मेळाव्यांत ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी सांगितली. त्यांचा जन्म ११९७ मध्यें पैठणजवळ आपेगांवीं झाला. केवळ १६ व्या वर्षी ज्ञानेश्वरांनीं महाराष्ट्राची संस्कृति मजबूत करणारा हा दिव्य आद्य धर्मग्रंथ रचला ! नंतर तीर्थयात्रादि निमित्तानें पर्यटन करून शके १२१८ मध्यें त्यांनीं समाधी घेतली. २१ वर्षांत सर्व कार्य संपविलें !

८ पू. विनोबांनीं ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरीसंबंधानें वेळोवेळीं परम आदराचे उद्गार काढलेले आहेत. गीता-प्रवचनांच्या तेराव्या अध्यायाच्या शेवटीं ते म्हणतात- " सद्गुणांचा

विकास समाजांत व्हावा, सत्यस्वरूप परमात्म्याचा महिमा समाजांत वाढावा, याची ज्ञानदेवांस तळमळ होती. ज्ञानदेवांनीं या गुणांचें वर्णन करतांना आपला सारा अनुभव ओव्यांत ओतला आहे. मराठी भाषा बोलणाऱ्यांवर त्यांचे हें अनंत उपकार आहेत. ज्ञानदेवांच्या रोमरोमामध्यें हे गुण भिनले होते. रेड्यावर मारलेल्या चाबकाचे वळ ज्ञानदेवांच्या पाठीवर उठले. भूतमात्रांबद्दल असा त्यांना कळवळा होता. अशा कारुण्यानें भरलेल्या हृदयांतून ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरी प्रकट केली. त्यांनीं लिहिलेलें तें गुणवर्णन वाचावें, त्याचें मनन करावें, अंतरीं ठसवावें. ज्ञानदेवांची गोड भाषा मला चाखावयास मिळाली याची मला धन्यता वाटते. ज्ञानदेवांची गोड भाषा माझ्या तोंडांत बसावी म्हणून मला जन्म प्राप्त झाला तरी धन्यता वाटेल"

पू. विनोबांच्या अशा अनेक उद्गारांनीं त्यांच्या सहज सहवासांत राहिलेल्या साधकांना ज्ञानेश्वरीचा अभ्यास करण्याची बुद्धि होणें अगदीं स्वाभाविक आहे.

९ ह्या वैयक्तिक अभ्यासाचा उपयोग अन्य जनांना हि होईल या उद्देशानें ता. ३-९-१९४३ रोजीं गिरणातीरावर भडगांव येथें माझे एक दिवंगत विद्यार्थी बाबूलाल हजारीमल यांच्या जीनमधल्या एकांत जागेंत,साडे तीन महिने राहून, गणेशचतुर्थीला प्रस्तुत ज्ञानेश्वरी दर्शन ग्रंथाची रचना पूर्ण केली. आणि १९५३ मध्यें आतां दहा वर्षांनीं ग्रंथ प्रकाशित होत आहे.

१० या ग्रंथाच्या सहाय्यानें ज्ञानेश्वरीचें सम्यक् दर्शन होण्याला मदत मिळेल, म्हणून च याला "ज्ञानेश्वरीदर्शन" म्हटलें आहे. एखाद्या भव्य इमारतींत जाऊन, तिच्या विविध दालनांत प्रवेश करून, तेथली विविध शोभा पाहून हि मनुष्याला त्या इमारतीची योग्य प्रमाणशुद्ध कल्पना येत नाहीं. भव्यतेंतला, वैविध्यांतला, काव्यकलाकृतींतला, प्रतिभाशाली ग्रंथांतला मूळभूत पाया

काय हें जर न पाहिलें तर त्या त्या कृतीचा आस्वाद घेऊन हि बिनचूक असें त्या कृतीचें दर्शन होत नाहीं. तें दर्शन व्हावें म्हणून एक प्रकारें हा ज्ञानेश्वरीचा नकाशा च तयार केला आहे. त्यामुळें ज्ञानेश्वरीचें दर्शन सुलभ व्हावें अशी कल्पना आहे. ज्ञानेश्वरीकोश पाहून, निर-निराळ्या थोर लेखकांनीं दिलेला तिचा अर्थ वाचून, ज्ञानेश्वरीचा मूळ मुद्दा चोहक्यांत लक्षांत येत नाहीं. मनुष्य प्रवाहाबरोबर पुढें च वाहत जातो. या ग्रंथाच्या साह्यानें ज्ञानेश्वरींचा आस्वाद घेत घेत त्या त्या श्लोकांतला भाग, ज्ञानेश्वरींत कसा कोठें आला आहे हें एकदम लक्षांत येईल, मूळ गीतेंत नसलेलें विवेचन कोठें कसें आलें आहे तें एकदम प्रथमदर्शनीं कळेल, दृष्टांता-दिकांतला हेतु व स्वरूप स्पष्ट होईल, सोडून दिलेलीं गीतेचीं पदें व श्लोक हि नजरेंत भरतील, अध्यायांच्या आणि श्लोकाश्लोकांच्या प्रास्ता-विक विभागाची छाननी होईल आणि ज्याप्रमाणें कुलूप खोलतां च इमारतींत प्रवेश होतो, त्याप्रमाणें अत्यंत सुलभतेनें सामान्य जनांस हि ज्ञानेश्वरींत प्रवेश करतां येऊन ज्ञानेश्वरीचें दर्शन घेतां येईल.

११ हें दर्शन घेतां यावें म्हणून मुद्दाम मोकळेपणानें तो तो मुद्दा कंसांत अलग मांडून पुढें ओंव्यांचे आंकडे दिले आहेत. ते भिड्यांच्या मोठ्या सार्थ ज्ञानेश्वरीवरून दिले आहेत, तथापि मागें पुढें कोणत्या हि ज्ञानेश्वरीला ते उपयुक्त ठरतील. मुद्द्यामध्यें विशेष किंवा भिन्नता दर्शविण्यासाठीं × + = 0 * अशीं अनेक चिन्हें वापरलीं आहेत. पृथक्करण एकदम डोळ्यांत भरावें म्हणून मोकळी जागा सोडली आहे. अभ्यासकाला जर विशेष कांहीं सुचलें तर या जागेचा उपयोग करतां येईल.

१२ त्याशिवाय या ग्रंथावरून अभ्यासकाला अनेक तऱ्हेचीं उपयोगी परिशिष्टें तयार करण्याला मदत मिळेल. उदा०

१ ज्ञानेश्वरींत गीतेंतील श्लोक पदें इ.ची उलटापालट—

१

५ + श्लो. ६ तील उत्तमौजा + ५ मधील शैब्य

१

६ मुळांतील समितिंजय विशेषण कृपाचार्यांचें असून सौमदत्तीला लावलें.

१

५ कुंतिभोज + श्लो. ६ युधामन्यु + ५ मधील पुरुजित्

१ १

१७ व्या च्या आधीं १८ वा श्लोक २७ श्वशुरान्सुहृदश्चैव

+ पौत्र श्लो. २६ मधील बंधूनवस्थितान् तान्समीक्ष्य

१

स कौंतेय: २९ पूर्वी ३० व्या श्लोकांतील उत्तरार्ध

१

४१ उत्तरार्ध + श्लो. ४३ मधील ' उत्साद्यंते जातिधर्मा:

२

३६ येषां च त्वं बहुमतो श्लो. ३५ मधून

२

३७ केशव पश्यपश्यप्यासि श्लो. ३८ मधून

६ ६

३९ ( ३७, ३८ व्या अगोदर ) श्लो. ३७ मयंति

अद्वयोपेतो नंतर श्लो. ३८ उत्तरार्ध नंतर श्लो. ३८

पूर्वार्ध नंतर श्लो. ३७ उत्तरार्ध

६

श्लो. ४२ व्या उत्तरार्धापूर्वी श्लो. ४१ घालून मग

श्लो. ४२ उत्तरार्ध

७

८ पूर्वार्ध, नंतर ९ पुण्यो गंधः पृथिव्यांच, नंतर ८
प्रणवः सर्ववेदेषु शब्दःखे पौरुषं नृषु, नंतर
९ तेजश्चास्मि विभावसौ जीवनं सर्वभूतेषु

७

१० व्या श्लोकपूर्वार्धानंतर श्लो. ८ मधील तपश्चास्मि विभावसौ

८

२२ नंतर २१

१०

४० नंतर ३९

११

४ पश्य मे पार्थ रूपाणि ५ श्लोकांतील

१३

२२ मधील ' भोक्ता ' पद २१ मध्यें

१४

११ व्या नंतर १४ वा श्लोक

१४

१२ श्लोक पूर्ण नंतर १५ चा पूर्वार्ध

१४

१३ श्लोक पूर्ण नंतर १५ व्या चा उत्तरार्ध

१५

१ मधील छंदांसि यस्य पर्णानि २ मध्ये

२ ज्ञानेश्वरींत सोडलेली गीतेंतील
श्लोक पदे ३० —

१

२३ धार्तराष्ट्र खेरीज सर्व श्लोक

१

३५ ' किंतु महीकृते '

१

३६ एतान् आततायिनः

१

३८ उत्तरार्ध

१ / ३९ 'दोषं' खेरीज सर्व उत्तरार्ध — १ / ४० सनातन पद

२ / २ कश्मल पद — २ / ५ अर्थकामान् पद — २ / १३ जरा पद

२ / १४' आगमापायिनो — २ / १५ धीर पद

२ / १८ श्लोकांतील मधले दोन चरण — २ / २० श्लोकाचे

प्रथम तीन चरण — २ / २१ सर्व श्लोक

२ / २४ पूर्वार्ध — २ / २५ उच्यते पद — २ / २९ आश्चर्यवत् पद

सर्वत्र — २ / २९ वेदन चैव कश्चित् — २ / ३२

स्वर्गद्वारमापावृतम् — २ / ४५ नित्यसत्त्वस्थः निर्योगक्षेमः

२ / ५४ किं व्रजेत् — २ / ६१ उत्तरार्ध — २ / ६४ प्रसादमधिगच्छति

२ / ७१ निर्मम पद — ३ / ८ कर्मण्यायोह्यकर्मणः

३ / ८ उत्तरार्ध — ३ / ९ उत्तरार्ध — ३ / १८ सर्व श्लोक

३ / २४ उत्तरार्ध — ३ / २९ उत्तरार्ध — ३ / ३३ सर्व बहुधा

३ / ४० सर्व श्लोक

३ / ४१ उत्तरार्ध

३ / ४२ " गतबुद्धि,"

खेरीज सर्व श्लोक

३ / ४३ सर्व श्लोक

४ / १ अव्यय पद

४ / २ एवं परंपराप्राप्तं

४ / ६ भूतानां ईश्वरोऽपिसन्

४ / १५ उत्तरार्ध

४ / १६ यज्ज्ञात्वा मोक्षसेऽशुभात्

४ / २० निराश्रयः + श्लो. उत्तरार्ध

४ / २१ यतचित्तात्मा

४ / २२ समः सिद्धावसिद्धौ च

४ / ३५ आत्मनि पद

४ / ३६ प्लवदृष्टांत

४ / ३७ उत्तरार्ध

४ / ३८ उत्तरार्ध

४ / ४१ सर्व श्लोक

५ / ७ पूर्वार्धांतील तीन्ही पदें

५ / ११ आत्मशुद्धये

५ / १३ वशी

५ / १४ उत्तरार्ध

५ / १५ उत्तरार्ध

५ / १७ गच्छंत्यपुनरावृत्ति

५ / १८ विद्याविनयसंपन्न

५ / २० असंमूढ

५ / २३ कामक्रोधोद्भवं वेगं पर्यंत सर्व श्लोक

५ — २५ बहुतेक पदें

५ — २६ उत्तरार्ध

५ — ८ तृप्तात्मा

६ — ९ मध्यस्थ

६ — १० निराशीर्यतचित्तात्मा

६ — १४ प्रशांतात्माचा कांहींसा आधार बाकी सर्व श्लोक

६ — १५ पूर्वार्ध

६ — १८ निःस्पृहः सर्वकामेभ्यः

६ — २० तुष्यति

६ — २१ बुद्धिग्राह्य, चलति तत्त्वतः

६ — २७ सर्व श्लोक ( बहुतेक )

६ — ३७ योगाच्चलितमानसः

६ — ४२ उत्तरार्ध

६ — ४४ उत्तरार्ध

६ — ४७ श्रद्धावान्भजते मद्गतेंतरात्मा या खेरीज सर्व श्लोक

७ — १ मय्यासक्त, मदाश्रय पदें

७ — ११ कामरागविवर्जितं

७ — १३ अव्यय पद

७ — १८ उदाराः सर्व एवैते

७ — २५ अजमव्ययम्

८ — ९ कवि पद

८ — २२ उत्तरार्ध

१० — ११ ज्ञानदीपेन भास्वता

१० — १९ दिव्याः

१० — ५ चतुर्थ चरण

११
१५ कमलासनस्थं

११
१८ शाश्वतधर्मगोप्तामधील " शाश्वत "

११
२७ दंष्ट्राकरालानि भयानकालानि

११
२८ अभिविज्वलंति

१४
६ निर्मलत्वात् प्रकाशकमनामयम्

१४
५ देहिनं अव्ययं

१५
२ प्रपद्ये

१७
६ तान्विद्ध्यासुरनिश्चयान् खेरीज

सर्व लोक

१७
१४ प्राज्ञ

१८
७८ धनुर्धर

३ ज्ञानेश्वरींत भावार्थानें निरूपिलेले
लोक पदें इत्यादि —

१
४३

२
५,१२

२
१९ उत्तरार्ध

२
२६ पूर्वार्ध

२
३३ उत्तरार्ध

२
३४ उत्तरार्ध

२
३९ ज्ञानिनो नित्यवैरिणा

२
४२,४३,४४

२
६५ उत्तरार्ध

२
६७

२
६८, ६९, ७१

३
५

३
६ उत्तरार्ध

३
९ पूर्वार्ध

३
२१

३
२२ पूर्वार्ध

३
२८

४
७

४
१३ उत्तरार्ध

४
२८ यतयः संशितव्रताः

| | | | |
|---|---|---|---|
| ५ / १४ पूर्वार्ध | ५ / १५ पूर्वार्ध | ५ / १६ पूर्वार्ध | |
| ५ / १७ पूर्वार्ध | ६ / २ | ६ / ३ उत्तरार्ध | ६ / ४ उत्तरार्ध |
| ६ / ५ | ६ / ६ पूर्वार्ध | ६ / १८ पूर्वार्ध | |
| ६ / १८ युक्त इत्युच्यते | ६ / १९, २०, २२, २३ | | |
| ६ / २९ उत्तरार्ध | ६ / ३०, ३३, ३४ | ६ / ३८ उत्तरार्ध | |
| ६ / ४० | ६ / ४५ पूर्वार्ध + अनेकजन्मसंसिद्ध | | |
| ६ / ४५ योगी संशुद्ध | ७ / १७ उत्तरार्ध | १० / १० पूर्वार्ध | |
| १३ / १६ पूर्वार्ध | १४ / ३ | १५ / ११ | १६ / १५ इत्यज्ञानविमोहिताः |
| १७ / २७ | १८ / ६४ उत्तरार्ध | | |

१३ ज्ञानेश्वरीदर्शनाच्या द्वारें अशीं अनेक उपयुक्त बोधमय परिशिष्टें निघूं शकतील. तीं सर्व अभ्यासकांवर सोपवून येथें ही अल्प प्रस्तावना समाप्त करतों.

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिन्ही लोकीं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥

महादेवमंदिर, धुळें १६-१-५३ शिवाजी नरहर भावे

श्री महाराष्ट्रधर्म ग्रंथमाला

ग्रंथ सहावा

# श्रीज्ञानेश्वरीदर्शन

( लेः- शिवाजी नरहर भावे, गांधीतत्त्वज्ञानमंदिर-धुळें )

[ विषयानुक्रमणी - हेत्वानिष्करण - सोडलेला भाग - मुळांत नसलेलें विवेचन - विशेष अर्थ इ. इ. ]

## अध्याय १

| | | |
|---|---|---|
| १५ तर्क — परशु | | ११ |
| १६ नीतिभेद — अंकुश | | |
| १७ वेदांत — मोदक | | |
| १८ बौद्धमतसंकेत — दांत | | १२ |
| १९ सत्कारवाद — वरदहस्त | | १३ |
| २० धर्मप्रतिष्ठा — अभयहस्त | | |
| २१ विवेक — सोंड | | १४ |
| २२ संवाद — दांत | | १५ |
| २३ उन्मेष — डोळे | | |
| २४ मीमांसा — कान | | १६ |
| २५ द्वैताद्वैत — गंडस्थळें | | १७ |
| २६ दशोपनिषदें — फुलें | | १८ |
| २७ अकार — दोन पाय | | १९ |
| २८ उकार — पोट | | |
| २९ मकार - मस्तक | | |

( ३ ) ॐकाराला नमन २०

— हें गणपतीचें रूपक थोडें बोजड च झालें आहे, गणपतीचा आकार हि बोजड असतो, त्याप्रमाणें रूपक आहे. ज्ञानेश्वरांचा व्यासंग यावरून सहज अनुमानतां येतो. सर्व वेदवेदांत, पुराणें, काव्यें, शास्त्रें इ. शब्दमात्र ॐकारांत अंतर्भूत आहे, हा या सर्व रूपकाचा थोडक्यांत मथितार्थ आहे. ॐकारांतून च गणपतीची मूर्ति निघाली, याचें सूचन १९ व्या ओवींत आहे. वेदांताला मोदक म्हणण्यांत ज्ञानेश्वरांची वेदांताची आवड दिसून येते. द्वैताद्वैत—गंडस्थळें एकवटलीं आहेत, या वर्णनांत द्वैताद्वैतवादविमुखता व समदृष्टि स्पष्ट होते. षड्दर्शनांच्या विरोधाचें सूचन हि केलें आहे. बौद्धमतखंडन मान्य करून पुन्हां त्याला तत्वज्ञानांत स्थान हि आहे. हें सूचित केलें आहे. धर्म-प्रतिष्ठा हा

वरदहस्त दाखवून वाङ्मयाचें कार्य दर्शविलें. तर्क व नीति ही दोन मुख्य शस्त्रें सांगून गणांचें म्हणजे समाजाचें गणपतीकरवी शासन सूचित केलें आहे. गणपतीचे डोळे लहान. कारण सूक्ष्मदर्शिता दर्शित व्हावी. ज्ञानेश्वरांची दशोपनिषदांची आवड शेंवटीं व्यक्त झाली आहे. उपनिषदांना फुलांची उपमा दिली आहे. ज्ञानेश्वरांच्या लेखनांतला साहित्यसरणीकडे असलेला कल येथें दिसून येतो. ४ ते ८ पांच ओंव्या जवळजवळ साहित्यसरणीला दिलेल्या आहेत. या वर्णनांत गणपतीचें एक वैशिष्ट्य जें पोट त्याचें वर्णन नाहीं, पायांचें हि वर्णन नाहीं. तसेंच मस्तकाचें हि यथास्थित वर्णन नाहीं. तीन्ही वर्णनें शेंवटीं ॐकाराच्या तीन मात्रांतून चित्रयुक्त दर्शवून गणपतीची मूर्ति सिद्ध केली.

(४) शारदेला नमन २१

(५) गुरूंना नमन २२–२७

१ गुरूंविषयीं स्वानुभव —

गुरूंमुळें संसारतरण २२

गुरूंमुळें पूर्ण कामत्व } २३,२४
दृष्टांत अंजन, चिंतामणि

गुरूंविषयीं सिद्धांत २५

तदनुसार दृष्टांत —

मूळसिंचन — शाखापल्लवसंतोष
समुद्र — सर्वतीर्थस्नान | २६
अमृत — सर्वरसप्राप्ति

गुरूंना नमन २७

(६) गीतेची मूळपीठिका महाभारतकथा २८–४९

१ गौरवानें ग्रंथस्वरूपकथन —

कला, विवेक, सुख, प्रमेय, रस, परमगति,
विद्या, सज्जनांचा जिव्हाळा, शास्त्र, धर्म,

श्लो. ११ — (१) श्लोकपूर्वार्ध १२१–१२३

(२) भवंतः सर्व एव हि भीष्ममेवाभिरक्षंतु १२३–१२४

× भीष्मास 'मी' असें च पहा.

---

श्लो. १२ — (१) तस्य संजनयन् हर्षं १२५

× दुर्योधनाच्या बोलण्यानें स्वतः भीष्म संतुष्ट झाले हा विशेष अर्थ.

(२) (कुरुवृद्धः पितामहः) ऐवजी सेनापति सिंहनादं १२५–१२६

(३) शंखं दध्मौ प्रतापवान् १२७

(४) दोन्ही आवाजांचें वर्णन १२८–१३०

× मुळांत हें वर्णन नाहीं. आवाजांची प्रचंडता दर्शविणारें वर्णन + पुढील वाद्यघोषाची प्रस्तावना ओवींचे दोन चरण

---

श्लो. १३ — (१) स शद्बस्तुमुलोऽभवत् १३१–१३२

× तुमुलशब्दपरिणामकथन

(२) श्लो. पूर्वार्ध + सहसैवाभ्यहन्यत १३३–१३४

× वाद्यनादाबरोबर वीरांचे रणघोष

(३) वाद्यघोषपरिणाम १३४–१३६

---

श्लो. १४,१५,१६ – (१) ततः १३७

(२) श्वेतैःहयैःमहति स्यंदने स्थितौ १३८–१४०

* विजयाचे निजसार–श्लेष गरुडबंधूंची उपमा दोन्ही दृष्टींनीं १ वेग २ भगवंतांचे वाहन

(३) मुळांत नसलेंले ध्वजवर्णन १४१

(४) माधवः पांडवश्चैव १४२–१४३

असा भाव. भूमीवर आम्हीं कोणाला
पसंत पडूं ? — २२७

श्लो. ३६ — ( १ ) निहत्य धार्तराष्ट्रान् पापमेवाश्रयेत } २२८
का प्रीतिः स्याज्जनार्दन } २२९

× एतान् आततायिनः पदें गाळलीं.
का" प्रीतिः स्यात्" चा अर्थ – मग
भगवत्प्रेम कोठून राहील असा केला.

( २ ) पुण्य नष्ट झाल्यानें भगवान् दूर } २३०
होईल. दृष्टांत कोकिळ, चकोर } २३२

श्लो. ३७ -- ( १ ) श्लोकपूर्वार्ध २३३
× संग्रामी शस्त्र न धरी –
शेवटच्या शस्त्रत्यागाची सूचना
तस्मात् – ओवी उत्तरार्ध दोन चरण.
( २ ) श्लोकउत्तरार्ध २३४–२३५
× श्लोकपूर्वार्ध पुन्हां भावार्थानें २३५
× अर्जुनाची मुख्य चिंता पुण्य नष्ट
होऊन भगवान् दुरावूं नये ही आहे.

श्लो. ३८ — ( १ ) हा श्लोक सोडल्यासरखा च आहे
( २ ) यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः २३६
अर्धी ओवी.
× दुर्योधनादि लोभी होते त्यापेक्षां अभिमानी
च मुख्यतः होते. म्हणून त्याप्रमाणें व्याख्यान

श्लो. ३९ — ( १ ) श्लोकपूर्वार्ध + दोषं ( उत्तरार्धांतलें
केवळ एक पद ) २३६–२४०
दोष टाळण्याला दृष्टांत —
१ कालकूट सेवन २३७

# अध्याय २

श्लो. १-- (१) संजय उवाच १

(२) अश्रुपूर्णाकुलेक्षणम् १

(३) कृपयाविष्टम् २-४

१ कृपाकारण स्नेह स्नेहकारण स्वकुलदर्शन

२ द्रवीभूत अर्जुनस्थितीला दृष्टांत पाण्यानें मीठ वाऱ्यानें ढग

३ अर्जुनाची कृपाविष्ट आणि खिन्न स्थिती दृष्टांत-राजहंस

(४) विषीदंतं ४

(५) भावार्थानें सर्व श्लोक ५

---

श्लो. २-- (१) श्लोकपूर्वार्ध थोडक्यांत ६-७

× कश्मल पद सोडलें

(२) कुतस्त्वा कश्मलमिदं ८-१६

अर्जुनाचें पूर्वस्थितिचित्र-

१ अनुचिताकडे लक्ष न देणारा

२ धीर

कुतस्त्वा:-- ३ यशस्वी

४ शूर

५ देवदानव जिंकणारा

६ पुरुषार्थी

अर्जुनाचें प्रस्तुतस्थितिचित्र:--

१ अधोमुख रडणारा

२ कारुण्यदीन

अर्जुनाच्या प्रस्तुत स्थितीला पूर्वस्थिति तुलनेनें दृष्टांत:--

सूर्य - अंधकारग्रस्त

वायु – मेघभीतिग्रस्त

अमृत – मरणयुक्त

कश्मलमिदं:—

अग्नि – इंधनग्रस्त

पाणी – लवणलीन

काळकूट – संसर्गमृत

नाग – दर्दुरग्रस्त

सिंह –कोल्हा

( ३ ) विषमे समुपस्थितं १७-१८

× पदशः व्याख्यान नाहीं म्हणून

हा उपदेश. पुढील श्लोकांत याचें सूचन.

१ मूर्खत्वत्याग

२ धनुर्बाणग्रहण

( ४ ) अनार्यजुष्टं १९

× अनार्यजुष्ट म्ह. अनार्याला

योग्य असें नव्हे; तर

जाणत्याला अयोग्य

( ५ ) अस्वर्ग्यं अकीर्तिकरम् २०

श्लो. ३ – ( १ ) श्लो. २ व ३ मिळून सरमिसळीनें व्याख्यान.

अस्पष्ट पदें

( २ ) क्लैब्यं मा स्म गमः पार्थ २१

× क्लैब्य = शोकावस्था

( ३ ) नैतत्त्वय्युपपद्यते २२–२७

× " तुज न हें उचित " प्रत्यक्षपद २२

१ मागील श्लोक अकीर्तिकरं ची छाया २२

२ मागील श्लोक कुतस्त्वा ची

छाया २३–२६

---

श्लो. १३ — ( १ ) देहिनोस्मिन्यन्था देहे १०८
( २ ) कौमारं यौवनं १०९
× जरा पद गाळलें
( ३ ) श्लोकउत्तरार्ध ११०
× धीर = ज्ञाता
( ४ ) पुढील श्लोकप्रस्ताव १११

श्लो. १४ — ( १ ) श्लोकपूर्वार्ध ११२-११९
१ मात्रास्पर्शपरिणाम ११२
२ परिणामद्विविधता ११३-११८
शब्दस्पर्शरूपरसगंधद्वारा
समजूत, रूपानंतर रस न
घेतां गंध.
३ श्लोकपूर्वार्ध एका ओवींत ११९
( २ ) विषयांची आपातरमणीयता १२०
स्वतंत्र व्याख्यान, विषयस्पर्शाचें कारण
( ३ ) अनित्याः ( विषयांचें वास्तवरूप ) १२१
दृष्टांत—मृगजळ
—स्वप्नहस्ती
( ४ ) तांस्तितिक्षस्व भारत १२२
१ आगमापायिनः पद गाळलें
२ विषय हे सहन करण्याजोगे
नाहींत. त्यांचा संग च सोडला
पाहिजे. मुळाहून स्वतंत्र
व्याख्यान

श्लो. १५ — ( १ ) सर्व श्लोक यथाक्रम १२३
× धीर पद गाळलें
१ समदुःखसुख = सुखदुःख
दोन्ही प्राप्त न होणें

२ अमृतत्वाला बाधा जन्माची
आहे. गर्भवास गेला कीं,
मृतत्व गेलें म्ह. अमृतत्व आलें.
( २ ) 'समदुःखसुख' गाळून सर्व श्लोक
उलट १२४

श्लो. १६ — ( १ ) श्लो. उत्तरार्ध + श्लो. पूर्वार्धभाव १२५–१३१
× पूर्वार्धभाव म्ह. सदसदात्मक
प्रपंच अगर उपाधि.
दृष्टांत – १ ओळख १२५
२ स्वीकार १२६
प्रपंच सोडून तत्त्वज्ञ संत
नित्यतत्त्व कसें स्वीकारतात
दृष्टांत – १ पाणी - दूध
२ किडाळ - सोनें
३ ताक - लोणी
४ भूस - बीज
( २ ) थोडक्यांत सबंद श्लोक १३२

श्लो. १७ — ( १ ) अविनाशि तु तद्विद्धि १३३
× असारस्वभाव – अनित्यता
सारस्वभाव – नित्यता
( २ ) येन सर्वमिदं ततम् १३४
+ तत्त्वाला नामवर्णआकारचिह्न
नाहीं हें सांगण्यांत " अविनाशि
तु तद्विद्धि " हें सांगावयाचें
आहे. कारण नामवर्णआकार
विनाशी.

श्लो. २३ — (१) सकारण सबंद श्लोक थोडक्यांत १४५
× कारण मुळांत नाहीं.
(२) पूर्व ओवींतील उरलेला श्लोकभाग १४६

श्लो. २४ — (१) शेवटचे दोन चरण १४७
(२) श्लोकपूर्वार्ध सोडला

श्लो. २५ — (१) अचिंत्योऽयम् १४८-१४९
१ तर्कागोचर
२ ध्यानगम्य
३ मनदुर्लभ
४ साधनातीत
} = अचिंत्य
(२) अव्यक्तो ऽ यम् अविकार्यो ऽ यम् १५०
× उच्यते पद सोडलें
(३) श्लोकउत्तरार्ध १५१

श्लो. २६ — (१) श्लोकपूर्वार्ध भावार्थानें १५२-१५५
× आदिस्थितिअंत हा नित्यप्रवाह
(२) श्लोकउत्तरार्ध १५६

श्लो. २७ — (१) सबंद श्लोक १५७-१५८
(२) दृष्टांत – घटिकायंत्र १५९-१६२
× प्रळयावसरीं त्रैलोक्यसंहार

श्लो. २८ — (१) तत्र का परिदेवनाचा भाव
(श्लोक प्रस्ताव) १६३
(२) श्लोकपूर्वार्ध + अव्यक्तनिधनानि १६४-१६५
(३) व्यक्त हा भास च १६६-१६८
दृष्टांत – १ स्वप्न
२ तरंगाकार पाणी
३ कनक अलंकार
४ आकाश अभ्रपटळ

श्लो. ६१ — ( १ ) तानि सर्वाणि संयम्य ३१५–३१६
( २ ) युक्त आसीत मत्परः ३१७
( ३ ) विषयांची शंका हि अनर्थकारक
( पुढील श्लोकप्रस्ताव ) ३१८–३२०
( ४ ) श्लोक उत्तरार्ध सोडला

---

श्लो. ६२ }
६३ } — ( १ ) श्लोकपूर्वार्ध + संगात्संजायते
कामः ३२१
× ध्यान = स्मरण
( २ ) कामात्क्रोधोभिजायते ३२२
× काम क्रोध एक च
तेथ क्रोध आधीं चि आला
( ३ ) क्रोधाद्भवति संमोहः ३२२
( ४ ) संमोहात्स्मृतिविभ्रमः ३२३
× चंडवातदृष्टांत
( ५ ) स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशः ३२४–३२७
× स्मृतिभ्रंशदशादृष्टांत–रात्र
स्मृतिभ्रंशानंतर बुद्धीची व्याकुळता
( ६ ) बुद्धिनाशात्प्रणश्यति ३२८
( ७ ) विषयध्यानापासून बुद्धिनाशापर्यंतचें पतन
× आग्निदृष्टांत ३२९–३३०

---

श्लो ६४ — ( १ ) श्लोकप्रस्ताव ३३१
× विषयपरिणामत्यागाला
विषयमूळ रागद्वेषत्याग
( २ ) श्लोकपूर्वार्ध ३३२-३३३
× सूर्यदृष्टांत

---

## अध्याय ३

× कर्मबंध नसण्याचें कारण
मिथ्यात्वभान. दृष्टांत — बहुरूपी

मुच्यंते तेऽपि कर्मभिः=कर्मांत
असून कर्मरहितावस्था

श्लो. ३२— ( १ ) ये मे मतं नानुतिष्ठंति १९४
× इंद्रियाधीनत्व हें कारण
( २ ) येत्वेतदभ्यसूयंतो १९५
× असूया=सामान्य लेखणें,
अवज्ञा करणें, पोकळ वाचाळता
समजणें
( ३ ) सर्वज्ञानविमूढान् १९६
दृष्टांत—मदिरा
विष
पंक
} उत्तरोत्तर नष्टतेकडे
( ४ ) विध्दिनष्टानचेतसः १९७-२००
अचेतसः—
१ शव = चैतन्यशून्य १९७
२ वायस = अल्पचैतन्य ( मूर्ख ) १९८
३ पतंग = दुष्टबुध्दि १९९
नष्टान् २००
× मूढांशीं बोलणें नको—मुळांत
नसलेलें २०१

श्लो. ३३— ( १ ) वास्तविक ह्या श्लोकावर
ज्ञानेश्वरांचें भाष्य मुळीं च नाहीं,
म्हटलें तरी चालेल. इंद्रियलालन
व देहाला भोग देण्यासंबंधी
निषेधक विवेचन आहे. तथापि
" प्रकृतिं यांति भूतानि " किंवा श्लो.
पूर्वार्ध ह्याचा अर्थ, शेवटीं देह

× मुव्यापेक्षां अधिक तीव्रता—
यांचा आश्रय नको. आठवण हि नको.

श्लो. ३५— ( १ ) श्रेयान्स्वधर्मो विगुणः २१९

× विगुण = कठिण – सुअनुष्ठितात
कडे लक्ष देऊन अर्थ

( २ ) परधर्मात्स्वनुष्ठितात् २२०

( ३ ) श्लोकपूर्वार्धाला दृष्टांत २२१–२२४

१ शूद्रगृहपक्वान्नें
२ लोकांचीं धवळारें
३ स्वपत्नी

( ४ ) अंतीं स्वधर्म श्रेय २२५–२२८

× स्वधर्मांत अंत श्रेयस्कर तसा अंतीं
स्वधर्म श्रेयस्कर.
दृष्टांत—साखर दूध
( दृष्टांतांत परधर्मभयावहता )

( ५ ) स्वधर्मे निधनं श्रेयः २२९

श्लो. ३६— ( १ ) अर्जुन उवाच २३०–२३१

( २ ) अनिच्छिन्नपि बलादिव इ. चा आधार
घेऊन " जाणत्यांना " हि स्थितिभ्रंश
कसा ? असा प्रश्न घेतला. आणि
पाप शब्दाचा अर्थ हि, तदनुसार
" स्थितिभ्रंश " " परधर्मस्वीकार " असा
केला. ( संबंद श्लोक संमिश्र तऱ्हेनें )

२३२–२३८

श्लो. ३७— श्रीभगवानुवाच २३९

## अध्याय ४

### चौथ्या आध्यायाचा प्रास्ताविक विभाग

स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ४४

( २ ) अव्ययात्मा ४५

× होणें जाणें मायाकारण

( ३ ) अवतारकालीन कर्मासंबंधी

( मुळांत कर्म नाहीं. पण पुढील

श्लोकांच्या आधारें ) ४६

( ४ ) थोडक्यांत भावार्थानें सर्व श्लोक ४७-४८

× भूतानामीश्वरोऽपि सन् सोडलें.

---

श्लो. ७,८- ( १ ) श्लो. ८ मधील ' परित्राणाय, चा

आधार घेऊन परमेश्वराची

धर्मरक्षणपरिपाटी ४९

( २ ) थोडक्यांत ( भावार्थानें ) श्लो. ७, ५०

( ३ ) श्लोक ८ सर्व ५१-५७

एकूण सर्व व्याख्यान मिसळून केलेलें आहे.

साधु=ईश्वरी जन

विनाशाय च दुष्कृताम्-

दैत्य=अज्ञान

अधर्म

अविवेक

पाप

दोष

दुष्कर्म करणारे आणि दुष्कर्म

दोन्ही परमेश्वर नष्ट करतो.

परित्राणाय साधूनां--

१ सज्जनांकरवी सुखाची गुढी

२ साधूंचें मानरक्षण म्ह.

— तो तूं परब्रह्म च समज
पंडित शब्द अशा पुरुषाला
कमी पडतो.

---

श्लो. २० -- ( १ ) त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तः १०६-१०७
( २ ) निराश्रयः व श्लो. उत्तरार्ध
सोडून दिला.

---

श्लो. २१,२२–( १ ) निराशीः ( श्लो. ७ ) १०८
( २ ) यदृच्छालाभसंतुष्टः
( श्लो.२२)+ त्यक्तसर्वपरिग्रहः १०९
( ३ ) शारीरं केवलं कर्म कुर्वन्
( श्लो. २१ )
+ कुर्वन्नाप्नोति किल्बिषं
+ द्वंद्वातीतः ( श्लो. २२ ) } ११०-११२
( ४ ) द्वंद्वातीतो विमत्सरः ( श्लो. २२ ) ११३
( ५ ) कृत्वापि न निबध्यते ( श्लो. २२ ) ११४
( ६ ) यतचित्तात्मा ( श्लो. २१ )
( ७ ) समःसिद्धावसिद्धौ च ( श्लो. २२ )
हा भाग सोडून दिला.

---

श्लो. २३ — ( १ ) श्लोकपूर्वार्ध ११५
× मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः
दोन्ही पदें भावार्थानें
( २ ) श्लोकउत्तरार्ध ११६-११८
× समग्रं ( कर्म ) दृष्टांत
अकालाभ्र ११७
विधिविधानें ११८

---

श्लो. २४ — (१) श्लोकप्रस्ताव ११९
(२) श्लोकपूर्वार्ध १२०
(३) श्लोकउत्तरार्ध १२१

---

श्लो. २५ — (१) श्लोकप्रस्ताव १२२

× यज्ञासाठीं स्त्री पाहिजे या कल्पनेनें ही ओवी लिहिली.

(२) श्लोकपूर्वार्ध १२३-१२४

× अविद्याकाम =हवन
गुरुवाक्य =हुताश
योगाग्निहोत्र

(४) श्लोकउत्तरार्थ १२५

---

श्लो. २६ — (१) श्लोकपूर्वार्ध १२६

× संयम=अग्नि
इंद्रियें=द्रव्य
मुक्तित्रय=मंत्र ( काया वाचा मन )

(२) श्लोकउत्तरार्ध १२७-१२९

× मनाचें नियमन=स्थान
वैराग्य=उजाळा
विकार=इंधन
आशा=धूर
अंतःकरणपंचक=पांचकुंडें
महावाक्य=मंत्र
विषय=आहुति
इंद्रिय=अग्नि

---

श्लो. २७ — (१) सवंद श्लोक १३०-१३९

विस्तृत रूपकः—
विवेक-मंथा

हृदय—आरणी
उपशम — मंथास्थिरीकरणसाधन
धैर्य — मंथा दाबणें
गुरुवाक्यसामर्थ्य — घुसळण
ज्ञान — अग्नि ( घुसळून प्रगट झालेला )
ऋद्धिसिद्धि — धूर
( ज्ञानाग्नीची पहिली ठिणगी )
मन — यमदमांनीं वाळलेलें पेटवण
वासना — समिधा
ममता — तूप
सोहं — मंत्र
इंद्रियकर्म — आहुती
प्राणक्रिया — स्रुवा
( शेवटची पूर्णाहुति )
ब्रह्मतादात्म्य = अवभृथस्नान
आत्मबोधसुख = पुरोडाश

---

## अध्याय ५

श्लो. २० — (१) पदशः व्याख्यान नाहीं
असंमूढः पद गाळलें.
(२) श्लो. पूर्वार्ध + स्थिरबुद्धि १०३
× प्रिय अप्रिय शुभाशुभ
गिरिवर म्हटल्यानें स्थिरबुद्धि
हें पद सिद्ध.
(३) ब्रह्मविद्ब्रह्माणि स्थितः १०४
× ब्रह्मवित् = समदृष्टि

---

श्लो. २१— (१) बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा १०५
(२) श्लोकउत्तरार्ध १०५
(३) पुन्हां बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा १०६–१०७
× कुमुददलदृष्टांत
(४) सर्व श्लोक थोडक्यांत १०८

---

श्लो. २२ — (१) श्लो. पूर्वार्ध + आद्यंतवंतः १०९–१२७
× १ आत्मसुखाभावीं भोगाला
लोक सुखकारक मानतात.
दृष्टांत– १ बुभुक्षित
२ तहानेला मृग
२ विषयसुख ही भाषा च
खोटी ११३–११९
दृष्टांत– विद्युत्स्फुरण
अभ्रच्छाया
विषकंद
मंगळ
मृगजळ
सर्पसावली

आमिष

पांडुरोगपुष्टि

— या दृष्टांतांत १ आद्यंतवत्ता

२ भयंकर परिणाम ३ मिथ्यात्व

४ आमिषकारकता ५ भ्रम

—— असे विषयांचे पंचगुण

दर्शित केले आहेत.

" साद्यंत चि जाण दुःख " यांत आद्यंतवंत

पद आणून आद्यंत कसे तें हि

दाखविलें आहे.

३ लोक विषयसुख कां भोगतात——

( अ ) भोगल्याशिवाय सरत नाहीं

म्हणून १२०

( आ ) आत्मसुख नाहीं म्हणून १२१

( इ ) विषयांत च असल्यानें

अभ्यासानें तें च सुख वाटतें

म्हणून १२२

दृष्टांत पुवांतले किडे, बेडूक, जलचर

( ई ) मायाहेतु, संसारहेतु, लोकांकरवी

सिद्ध होतो म्हणून १२३–१२७

( २ ) न तेषु रमते बुधः १२८

× बुध = विरक्त

---

श्लो. २३ ——( १ ) काम क्रोधोद्भवं वेगंपर्यंत

सगळा श्लोक सोडून च दिल्या

सारखें केलें. १२९ व्या ओवींत

---

श्लो. २६ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १४८
( २ ) श्लो. उत्तरार्ध १४९
× अस्पष्ट
( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव १५०

---

श्लो. २७ — ( १ ) स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यान् १५१
× शरीर इंद्रियमय होतें तें मनोमय केलें
( २ ) चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः १५२
( ३ ) श्लो. उत्तरार्ध १५३
× प्राणापान सम करणें म्ह. एक करणें
प्राणापान एक करून चित्ताकडे वळवितात हा खुलासा

---

श्लो. २८ — ( १ ) श्लोकपूर्वार्ध + विगतेच्छाभयक्रोधः १५४–१५६
* अस्पष्ट व्याख्यान
१ विगतेच्छाभयक्रोधः = वासनांतराची विवंचना १५५
२ यतेंद्रियमनः = जे वेळीं गगनीं लयो इ. १५५ – १५६
दृष्टांत १५४ गंगा
( २ ) मुक्त एव सः १५७
× मुक्त एव चा भाव शरीरींचि ब्रह्म होये.

---

श्लो. २९ — ( १ ) श्लोकपूर्वार्ध + "सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां" हा सर्व भाग सोडून दिला.

## अध्याय ६

सहाव्या अध्यायाचा प्रास्ताविक विभागः—

(४) षष्ठाध्यायगौरव व श्रवणार्थ
विनंति १०-१३

(५) या प्रसंगीं स्वतःच्या मराठी
बोलाविषयीं उद्गार १४-२२

× अमृत जिंकणारीं रसिक अक्षरें
कोमलता.
रसाळपणाच्या लोभानें इंद्रियांत
कलह.
शब्दाचा व्यापकपणा
कैवल्यरसाची मेजवानी

(६) श्रवणाधिकार
१ निष्कामत्व २२
२ इंद्रियांना न समजूं देतां, २३
३ शाब्दिकत्व सोडून, २४,२५
४ अति हळुवारपणें, २६
५ स्वर्गसंसारेच्छा सोडून, २८
६ ज्ञानपूर्वक, २९-३०
श्रवण करील तो अधिकारी.

(७) गुरुकृपेनें अगम्य गीतातत्त्व
उत्कृष्ट तऱ्हेनें मी सांगेन ३१-३६

---

श्लो. १ — (१) श्रीभगवानुवाच ३७-३८
(२) स संन्यासी च योगी च ३९-४२
× १ दोन्ही एकच ३९
२ फक्त नामभेद ४०
३ दृष्टांत— १ एक पुरुष दोन नांवें ४१
२ ,, ठिकाण ,, मार्ग ४१
३ ,, पाणी ,, घडे ४२

पावित्र्य, ब्रह्मभाव, धर्म, ] [ सिद्धि,
स्वर्ग दोन्ही बाजूंनीं गौरवयुक्त वर्णन.

---

श्लो. १० — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १०५
× या श्लोकपूर्वार्धावर केवळ
स्वतंत्र च भाष्य समजण्यास
हरकत नाहीं.
( २ ) एकाकी अपरिग्रही १०६
× निराशीः यतचित्तात्मा हीं
पदें सोडलीं
( ३ ) उपसंहार १०७
× सिद्धलक्षणें भगवंतांनीं
स्वतःपेक्षां हि गौरवून
सांगितलीं
एकूण ह्या श्लोकावरचें
व्याख्यान अर्धवट च
म्हटलें पाहिजे.

---

श्लो. ११ पासून सुरू होणाऱ्या
योगविषयाची प्रस्तावना १०७–१६२
( १ ) श्रीकृष्ण योग्याचा गौरव
करून योग्याच्या वर्णनाच्या समाप्तीचें
कारण सांगतात १०८–१११
× ज्ञान, विश्वरचना, तेज, कर्म,
गुण या आधारें गौरव.
( २ ) ब्रह्मविद्या उघड सांगितली तर
भक्तिप्रेम भोगतां येणार नाहीं हा
कृष्णाभिप्राय ११२–११५

लावण्याइतकें सामर्थ्य. १३५

( ६ ) श्रोत्यांसाठीं पुन्हां सुरवातीपूर्वी किंचित् अर्जुनभाग्यवर्णन १३६–१३८

( ७ ) अर्जुनाची ब्रह्मप्राप्तीचा उपाय सांगण्याविषयीं विनयपूर्वक विनंति व श्रीकृष्णाची अनुमति १३९–१४३

( ८ ) श्रीकृष्णाच्या अनुमतीवरून पुन्हां श्रीकृष्णप्रेमवर्णन १४४–१४६

( ९ ) अर्जुनाच्या ब्रह्मप्राप्तीच्या योग्यतेबद्दल आतां श्रीकृष्णाची खात्री १४७–१५१

( १० ) योगमार्गाचें श्रीकृष्णमुखानें गौरववर्णन १५२–१६०

× शंकर, योगी, ऋषि इ. महानुभाव यांचा हा च मार्ग

या मार्गांत—

१ तहानभूक इ. शरीरभाव रहात नाहीं.

२ कालभेद नष्ट होतो.

३ स्थलभेद नष्ट होतो.

४ या मार्गाचा मुक्काम आपण च.

( ११ ) अर्जुनाची मार्गश्रवणाची अधीरता १६०

( १२ ) श्रीकृष्णाच्या बोलण्याला सुरवात १६१

श्लो. ११— ( १ ) शुचौ देशे १६२–१७९

× सूक्ष्म वर्णन १६२–१७०

स्थूल वर्णन १७०–१७९

शुचि म्ह. पवित्रता व स्वच्छता

पवित्रता सूक्ष्म स्वच्छता स्थूळ

म्हणून दुहेरी वर्णन
पवित्रतावर्णनात —
१ अभ्यासवैराग्यवर्धक
२ उत्साहधैर्यसहजरमणीयतावर्धक
३ संतवसतियुक्त
४ योगप्रतिकूलांसहि योगानुकूल करणारी — अशी जागा सांगितली आहे.

स्वच्छता वर्णनांत —
१ साधकवसतियुक्त- साधक योगानुकूल मानसिक व बाह्य स्वच्छता निर्मितात.
२ जनसंमर्दरहित — लोकांची वर्दळ अस्वच्छता निर्माण करते.
३ फलयुक्त झाडें— शुचि फलाहारानें शरीरांत स्वच्छता
४ सौम्य ऊन— शरीरांत स्वच्छता निर्मितें
५ मंदशीत वारा— शरीरांत स्वच्छता निर्मितो
६ स्वच्छ निर्झरसमुदाय— स्वच्छ पाण्यानें स्नानादिस्वच्छता
७ श्वापदरहितता— श्वापदें घाण करतात
८ शकषट्पदरहितता— विना कारण लक्ष वेधूं नये म्हणून
९ हंससारसकोकिलमयूरांस

हरकत नाहीं ( क्वचित )

१० मठ किं...आ शिवालय— प्रत्यक्ष जागा

-- एक...ण स्वच्छ- एकांत- रमणीय स्थळ

( २ ) प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः १८०–१८१

( ३ ) चैलाजिनकुशोत्तरम् १८२–१८३

( ४ ) नात्युच्छ्रितं नातिनीचं १८४–१८५

× उंच आसन झाल्यास आंग डोलेल नीच झाल्यास भूमिदोष.

---

श्लो. १२ — ( १ ) तत्रैकाग्रं मनः कृत्वा १८६

× सद्गुरुस्मरण एकाग्रतेला आवश्यक

( २ ) यतचित्तेंद्रियाक्रियः १८७–१८८

× मुद्दाम चित्तेंद्रियक्रिया आवराव्या न लागता या गोष्टी सहज सुखपूर्वक झाल्या पाहिजेत असा अभिप्राय दिसतो.

( ३ ) उपविश्यासने १८९

( ४ ) युंज्याद्योगं १९०–१९१

× १ शरीर आपेआप स्थिर होणें
२ सर्व वायु एकवट होणें
३ चित्तप्रवृत्ति अंतर्मुख होणें

( ५ ) मुद्रावर्णन किंवा वज्रासन अथवा मूळबंध १९२–२००

( हें मुद्रावर्णन पुढील समंकायाशिरोग्रीवं या श्लोकाची प्रस्तावना समजण्यास हरकत नाहीं )

---

श्लो. १३ — ( १ ) समं काय २०१

× हातांची स्थिति

(२) शिर + संप्रेक्ष्य इ. श्लोक
उत्तरार्थ २०२–२०६
(३) ग्रीवा २०७–२०८
× म्ह. जालंदरबंध
(४) समं काय २०९–२१०
× नाभि उदर इ. ची स्थिति
म्ह. ओढियाणाबंध
श्लोकनिमित्तानें हठयोगांतील
बंधवर्णन केलें.

---

श्लो. १४ — (१) हा श्लोक सोडून च दिला आहे.
फक्त " प्रशांतात्मा " या पदाचा कांहींसा
आधार घेतलेला दिसतो.
(२) प्रशांतात्मा २११–२१३
× १ कल्पनानाश
२ प्रवृत्तिशमन
३ शरीरधर्मविस्मृति

---

योग्याच्या आसनावस्थेनंतर सिद्धावस्थेपर्यंत
म्हणजे महाशून्यांत लीन होईपर्यंत मूळाला
सोडून स्वतंत्र वर्णन २१४–३१८
(१) श्लो. १३ ओवी १९२–२०० मध्ये
सांगितलेल्या मूळबंधानें किंवा वज्रासनानें
कोंडलेल्या अपानवायूचें क्रमानें कार्य
२१४–२२०
× १ प्रथम मणिपूर चक्राला धक्के
२ शरीरस्थ सर्व मळनाश
३ कोठ्यांतील कफपित्तनाश

४ सप्तधातुसंशोधन

५ मेदनाश

६ अवयवशैथिलीकरण

७ व्याधींचा आभास व विनाश

८ जलतत्त्व पृथ्वीतत्त्व एकीकरण

तात्पर्य—

१ मळ व मेदविनाश

२ धातुशुद्धि

३ जलतत्त्व पृथ्वीतत्त्व साम्य

( २ ) श्लो. १३ ओवी १९२–२२०
मध्यें सांगितलेल्या आसनानें जागृत झालेल्या
कुंडलिनीची अवस्था व कार्य--

१ कुंडलिनीचें वर्णन २२१–२२५

× प्रमाण व अवस्था — ३॥ फेऱ्याची
अधोमुख निद्रित २२३ नाभिस्थानीं
२२५

कल्पना येण्यास उपमा —

१ नागिणीचें कुंकवानें न्हालेलें पिलू
२२२

२ विजेची सुरळी
३ अग्निज्वाळांची वळी
४ सोन्याची लगड
} २२४

( २ ) कुंडलिनीची जागृतीनंतर
प्रथमावस्था– २२६–२२७

× जागृतीला उपमा–

१ नक्षत्र तुटणें
२ सूर्यासन भंग
३ तेजबीजविरूढि
} २२६

— तात्पर्य ब्रह्मरंध्रांत कुंडलिनीचें तेज, तिची कांति, नाद वगैरें कांहीं च उरत नाहीं.

( ११ ) ब्रह्मरंध्रप्रवेश झाल्यानंतरची अवस्था २८९–२९०

| | |
|---|---|
| १ मनाला जिंकणें<br>२ वायु कोंडणें<br>३ ध्यान धरणें<br>४ संकल्पविकल्प | शिल्लक रहात नाहीं. |

( १२ ) उपसंहार २९१-२९२

१ हा मार्ग म्हणजे पिंडानें पिंडग्रास

२ याची परंपरा नाथसंप्रदाय

३ हा या अध्यायांत ध्वनिरूपानें कृष्णानें सांगितला

४ त्याचा विस्तार ज्ञानदेवांनीं केला.

( १३ ) ( पिंडाचा पूर्ण ग्रास दर्शविण्यासाठीं ) ब्रह्मरंध्रांत कुंडलिनी आल्यानंतरची आकाशाशीं मिळून जाण्यापर्यंतची योग्याची स्थिति २९३–३००

१ योगी या स्थितींत केवळ वायुरूप असतो, त्याला खेचर संज्ञा

२ योग्याच्या पावलोपावलीं सिद्धि

३ योग्याच्या शरीरांतील पृथ्वी, आप, तेज हीं तीन तत्त्वें नष्ट होतात.

४ कांहीं कालानें योग्याच्या शरीरांतला वायु हि आकाशांत लीन होतो. येथें पिंडाचा पूर्ण ग्रास झाला.

( १४ ) कुंडलिनीचा ब्रह्मरंध्रांत जाऊन
पुढें आकाशांत मिळेपर्यंतची स्थिति

३००-३१८

१ कुंडलिनी वर निघून जात असतां
तिची " मारुति " संज्ञा.

२ श्लो. १३ मधील जालंधरबंध
आतां सुटतो.

३ कंठस्थानांतील काकीमुख फोडून
कुंडलिनी वर ब्रह्मरंध्रांत जाते.

४ पश्यंति म्ह. कंठापुढें तिचें
ब्रह्मरंध्रांत निर्गमन

५ ब्रह्मरंध्रांत स्थिरीकरण अ - उ - म
या तीन ॐकारमात्रांपैकीं म
पर्यंत ती पोंचते.

६ या अवस्थेंत पंचमहाभूतविनाश.

७ यापुढें मकाराच्या हि पुढें प्राण
आकाशांत लीन होतो.

८ यापुढें आकाश हि महाशून्यांत
लीन व्हावयाचें.

९ हें सर्व आतां शब्दापलीकडचें
प्रकरण झालें. ३००-३१८

* —ओवी २१४ ते ३१८ या शंभर
ओव्यांतलें हें साद्यंत योगवर्णन काव्यमय
आणि अद्भुत असलें तरी गुंतागुंतीचें
आणि पाल्हाळिक झालें आहे यांत शंका
नाहीं. तें मुळाला सोडून तर आहे च.
त्यामुळें योगविषयाची गूढता च ठसली

जाते. उकल थोडा होतो.

— हें सर्व वर्णन ज्ञानेश्वरांच्या अनुभवाचें निःसंशय नाहीं. कारण असा सबंद पिंडासकट जीव महाशून्यांत विलीन करण्याचा अनुभव ज्याला आला तो बोलण्याला शिल्लक च उरणार नाहीं. तथापि ब्रह्मरंध्रांत कुंडलिनीचा प्रवेश झाल्यानंतर ज्ञानेश्वरांनीं वर्णनाचा उपसंहार केला आहे. तेथपर्यंत तरी त्यांना अनुभव होता असें कोणी म्हणूं शकतील.

इतकें मात्र खरें कीं, ही पिंडासकट जीव महाशून्यांत लीन करण्याची कल्पना ज्ञानेश्वरांच्या आवडीची दिसते.

१ पवित्रस्थान

२ यमनियम

३ आसन

४ शरीरशुद्धि

५ कुंडलिनीजागृति

६ कुंडलिनीकडून आप व
पृथ्वी या भूतांचा विनाश

७ कुंडलिनीच्या मस्तकांतील
बोधप्राप्ति

× मस्तक = बुद्धिकेंद्र

सतरावीचें अमृत म्ह बोध

८ कुंडलिनीचें हृदयांत
वास्तव्य व तेथें नादानुभव
× हा नाद म्ह. पुढें
जाण्याच्या प्रेरणेचा आवाज.

९ कुंडलिनीचें ब्रह्मरंध्रांत
प्रयाण ( मस्तकांत )

१० येथें आप पृथ्वीच्या बरोबर
तेज या भूताचा हि विनाश

११ ब्रह्मरंध्रांतील आकाशांत
कुंडलिनीची लीनता म्हणजे वायु-
तत्त्वाचा हि विनाश.

१२ ब्रह्मरंध्रांतील आकाशाची
महदाकाशांत म्हणजे शून्यांत लीनता,
म्हणजे पूर्णपिंडविनाश.

— एकंदर वर्णनावरून अशी
निष्कर्षपरंपरा निघते. आतां
यांतील कुंडलिनीचें स्पष्टीकरण –
कुंडलिनी ही एक अशी शक्ति
कल्पिली आहे कीं, जिच्या
निद्रावस्थेंत पंचमहाभूतांचा पिंड
पोसला जाऊन जीव त्यांत बद्ध
होतो. ती जागृत झाल्यावर क्रमा-
क्रमानें पंचमहाभूतांचें शोषण
होऊन जीव व पिंडासकट ती
स्वतः महाशून्यांत लीन होते.
गर्भांत नाभिस्थानापासून च सर्व
पिंडपोषण होतें. तेथें चं ही

शक्ति कल्पिली आहे. — ज्ञानेश्वरांनीं
हें सर्व वर्णन काव्यमय विस्तारानें
करून वेळोवेळीं योग्याच्या अवस्थेचीं
रमणीय वर्णनें केलेलीं आहेत.

---

श्लो. १५ —( १ ) उत्तरार्धाच्या आधारावर विवेचन
३१९-३२७॥

× मत्संस्थाम् पदाधारें विशेषणयुक्त
वर्णन ३१९-३२४

१ तर्कातीतता
२ अवस्थातीतता
३ जगन्मूलता
४ अव्यक्तता
५ व्यक्ताधारत्व
६ अवतारस्वरूपता

—ज्याला आहे असें असा विशेषण-
निष्कर्ष निघूं शकेल.

( २ ) शांति निर्वाणपरमां अधिगच्छति
३२५-३२७॥

( ३ ) पुढील श्लोकप्रस्तावार्थ
अर्जुनाचा प्रश्न ३२७॥-३३७

१ अर्जुनाची श्रीकृष्णविवेचनाला
मान्यता ३२७॥-३३१

२ जो योग सांगितला त्याला
योग्यता लागेल कीं कोणाला हि
याचा अभ्यास करतां येईल ३३२-३३७

( ४ ) श्रीकृष्णाचें अर्जुनाला उत्तर ३३८-३४४
हीं पदें सोडलीं.

अर्थ येथें बदलला जो ४०५ ते
४०७ मध्यें केला होता व जो
मुळांतला आहे.

( ४ ) पुढील श्लोकप्रस्ताव ४०९–४१०

× आत्मौपम्य साम्याखेरीज
जगांत प्राबल्य नाहीं.

श्लो. ३३ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध + उत्तरार्धभाव ४११

श्लो. ३४ — ( १ ) चंचलं हि मनः कृष्ण
उत्तरार्धांतील वायुदृष्टांत | ४१२–४१३

× मुळाच्या जोडीला मर्कटदृष्टांत

( २ ) प्रमाथि बलवत् ४१४

( ३ ) दृढम् ४१५–४१६

× विवेक संतोषनाशकारकता
मुळाहून स्वतंत्र

( ४ ) श्लो. उत्तरार्धभाव ४१६–४१७

श्लो. ३५ — ( १ ) श्रीभगवानुवाच + श्लो. पूर्वार्ध ४१८

( २ ) श्लो. उत्तरार्ध ४१९

( ३ ) मनाची मुळांत न सांगितलेली
खुबी ४२०

श्लो. ३६ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध ४२१

× असंयतात्मा = अभ्यासवैराग्यहीन

( २ ) श्लो. उत्तरार्ध ४२२–४२६

× प्रश्नाचा उपयोग करून मुळाला
जोरदारपणा आणला आहे.
मन निश्चळ होईल कसें, त्याचा

श्लो० ४२ , ४३ — ( १ ) अथवा योगिनामेव
कुले भवति धीमतां ४४९-४५१
× योग्यांचें वर्णन :—
१ ज्ञान–अग्निहोत्र
२ परब्रह्म–श्रोत्रिय ?
३ आत्मानंद–वतन
—गार्हस्थ देखावा
४ सिद्धांत–सिंहासन
५ त्रिभुवन–राज्य
— राज्य वैभव
१ कोर्काळ–संतोषवनस्थ
२ विवेकमूलवसति
—वनवैभव
गार्हस्थ्य, राज्य आणि वन-
वैभव तीन आधारांनीं वर्णन.
( २ ) श्लो. उत्तरार्ध ( मध्यें च ४३ वा
श्लोक घालून हा शेंवटीं उत्तरार्ध
आला आहे ) ४५५-४५६

श्लो. ४३ — ( ३ ) श्लो. पूर्वार्ध ४५२-४५४
× ज्ञानेश्वरांचें स्वचरित्र च
यांत गोवलें आहे.
( ४ ) श्लो. उत्तरार्ध गाळला.

---

श्लो. ४४ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध ४५७-४६४
× पूर्वाभ्यासेन तेनैव ४५७
ह्रियंते ह्यवशोऽपिसः ४५८-४६१
योगभ्रष्टवर्णन ४६२-४६४

( २ ) श्लो. उत्तरार्ध गाळला तरी ४५९ व्या ओवींत " तैसे दुर्भेद्य जे अभिप्राय " या ओवींत त्याचा भाव कल्पितां येईल.

---

श्लो. ४५ — ( १ ) श्लो. पूर्वार्धभाव+अनेक जन्मसंसिद्धभाव ४६५–४६६
( २ ) ततो याति परां गतिम् ४६७–४७०
( ३ ) योगी संशुद्धकिल्बिषः चा भाव ४७१
( ४ ) ततो याति परां गतिम् पुन्हां ४७२–४७३

---

श्लो. ४६ — ( १ ) कर्मिभ्यः ४७४
( २ ) ज्ञानिभ्यः ४७५
( ३ ) तपस्विभ्यः ४७६
( ४ ) अधिकत्वकारण ४७७–४७८
( ५ ) थोडक्यांत श्लो. पूर्वार्ध + कर्मिभ्यश्चाधिकः ४७९
( ६ ) योग्याचा गौरव ४८०
× शरीरधारी असून हि ब्रह्मज्ञानी महिमा
( ७ ) तस्माद्योगी भवार्जुन ४८१

---

श्लो. ४७ — ( १ ) सबंद श्लोकांतलीं श्रद्धावान्भजते व मद्गते नांतरात्मा एवढीं च पदें घेऊन त्यावर व्याख्यान केलें आहे म्ह. श्लोकाचा

× शांतिरसोत्कटता

|

सिद्धांतबीज

|

अंकुर

पेरणारे निवृत्तिनाथ

सात्त्विकभाव वृष्टि

|

आत्मभावना ढेकूळे विरणें

|

चतुराचित्त वाफे

|

चाडें ज्ञानेश्वर

---

## अध्याय ७

(३) पुन्हां सर्व श्लोक थोडक्यांत १३

(४) म्हणून हें सांगणें फार मोठें काम १४

---

श्लो. ४ — (१) प्रकृतीची माया म्हणून ओळख १५

(२) मे अष्टधा भिन्ना प्रकृति १६

(३) प्रकृति अष्टधा वशी ऐक १७

(४) श्लो. पूर्वार्ध+अहंकार १८

---

श्लो. ५ — (१) श्लो. पूर्वार्ध १९

× आठांची साम्यावस्था म्हणून परा

(२) जीवभुतां २०–२१

× मनाकरवीं मानवी शोकमोह
अर्जुनाला उद्देशून

\+ १ जडाला – चेतनत्व
२ चेतनाला – प्रेरणा
३ मनाला – शोकमोह
४ बुद्धीला – जाणणें
} प्रकृतिकार्य

(३) ययेदं धार्यते जगत् २१

× जगत् प्रकृतीच्या अहंभावामुळें
धरलें जातें

---

श्लो. ६ — (१) श्लो. पूर्वार्ध २२

ही सूक्ष्म प्रकृति स्थूल होऊं
लागते तेव्हां भूतसृष्टीची टाकसाळ
सुरू होते.

(२) टांकसाळीचें रूपक २२–२५

चार ठसे = जरायुज, अंडज
जारज, स्वेदज

चौऱ्यांशी लक्ष नाण्यांचें पर

= अफाट भांडार

---

---

श्लो. १३ — (१) श्लो. पूर्वार्ध + मोहितं ६०–६३

× समजुतीसाठीं दृष्टांत –

१ पाणी – शेवाळ

२ आकाश – आभाळ

३ जागृति – स्वप्न

४ डोळा – डोळ्यावरचें पटल

(२) नाभिजानाति ६५

(३) भूतें माझीं च परंतु मी त्यांची नव्हे } ६४–६५

बहुधा परं पदार्थें दृष्टांत —

मोती – पाणी

घडा – पृथ्वी

(४) पुढील श्लोकप्रस्ताव व सर्वश्लोकभाव ६६–६७

× अव्यय पद गाळलें.

---

श्लो. १४ — (१) श्लो. पूर्वार्ध ६८–९६

+ मायानदीचें विस्तृत वर्णन

१ मायानदीचें मूळ — ब्रह्माचलाचा माथा (दैवी पदावरून) ६९

२ पहिली धार – संकल्पजल

३ बुडबुडा – महाभूत

प्रथमस्वरूप

४ ओघ – सृष्टिविस्तार

५ वेग – काळ

६ तट – प्रवृत्तिनिवृत्ति

पुढील स्वरूप

७ वर्षाव – गुणत्रय (गुणमयी पदावरून)

८ महापूर – मोह
९ वाहून नेलेलीं नगरें – यमनियम
१० भोंवरे = द्वेष
११ वळसे – मत्सर
१२ महामीन – प्रमाद
१३ वळण – प्रपंच
१४ लोंढे – कर्माकर्म
१५ कचरा – सुखदुःख
१६ बेट – विषयविलास
१७ काम – बेटावर आदळणाऱ्या लाटा
१८ जीव – बेटावर अडकलेला फेस
१९ अहंकार – चालणाऱ्या लाटा
२० मदत्रय – उकळ्या
२१ विषय – प्रचंड लाटा
२२ लोंढे – उदयास्त
२३ डोह – जन्ममरण
२४ बुडबुडे – पंचभूतात्मक सृष्टि
२५ मासे – संमोहविभ्रम
२६ गढूळपणा – भ्रांति
२७ दलदल – श्रद्धा ( ठणक राहिली नाहीं दलदल झाली )
२८ खळखळाट – रजोगुण
२९ मोठा जोराचा प्रवाह – तमोगुण
३० संथपण – सत्वगुण

( २ ) मायानदीचें दुस्तरत्व ८० -- ८१ ( ८० -- ९६ )

× १ सत्यलोकाचे किल्ले खचतात

२ ब्रह्मगोलकाचे धोंडे घरंगळतात

३ या नदीचा लोंढा अजून थांबत च नाहीं.

+ मायानदी तरण्याचा उपाय हा च
  अपाय होऊन बसतो ८२ – ९१

१ स्वयंबुद्धि २ ज्ञान ३ वेदत्रय

४ तारुण्य ५ यजनक्रिया ६ कर्म

७ योग — या सर्वांच्या प्रयत्नांची
  झालेली दुर्दशा

+ मायानदी स्वतःच्या बळानें तरणें अशक्य
९२–९६

दृष्टांत —

१ पथ्य न करणें – रोग बरा होणें

२ दुर्जनबुद्धि – आवाक्यांत आणणें

३ लोभी – आलेली सिद्धि टाकणें

४ चोर – भरसभेंत घुसणें

५ मासा – गळ गिळून टाकणें

६ भ्याड – आखिणीवर उलटणें

७ हरिणशावक – जाळें तोडणें

८ मुंगी – मेरु ओलांडणें

९ कामी – स्त्रीत्याग

( ३ ) मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ९७–१०२

१ थोडक्यांत श्लो. पूर्वार्ध ९७

२ विस्तारानें श्लो. पूर्वार्ध ९८--१०२

✕ ईश्वरशरणतेचे उपाय --- ( तरणोपाय )

१ सद्गुरु – तारू

२ अनुभव – कास

३ आत्मबोध – तराफा
४ अहंकार ओझें – त्याग
५ संकल्पविकल्प – पाण्याचा झुळका
६ विषयासक्ति – मोठी धार टाळणें
७ ऐक्य – उतार
८ आत्मबोध – सांगड
९ नैराश्य – पैलतीर
१० वैराग्य – हात मारणें
११ अहंब्रह्मास्मि – तरण्याचें श्रद्धासामर्थ्य
१२ निवृत्ति – तटप्राप्ति

× मायानदीचें रूपक फार विस्तृत झालें. विस्तारामुळें पुष्कळ वेळा बोजडपणा येतो.
ईश्वरशरणतेचे उपाय यांत प्रथम सद्गुरु तारू घेऊन शेवटीं निवृत्ति म्ह. तटावर पोंचणें घेतलें.
सद्गुरु निवृत्तिनाथांना आद्यंतीं खुबीनें गोंवलें !



× आसुरभावांत मुख्य म्ह. अहंकार



× मायेनें ग्रसल्याचें चिह्न. आपण या जन्मांत ज्या कार्यार्थ

आलों तो कार्यभाग पुरे
विसरणें

श्लो. १६ — ( ४ ) श्लो. पूर्वार्ध १०८
( ५ ) श्लो. उत्तरार्ध १०९

श्लो. १७ — ( १ ) तेषां ११०
( २ ) तेषां व नित्ययुक्त०

श्लो. पूर्वार्ध १११

× ज्ञानी सर्वथा निरपेक्ष हे
त्याचे वैशिष्ट्य. इतर तिघे
हि भक्त अपेक्षा राखतात.

( ३ ) नित्ययुक्त ११२
( ४ ) ज्ञानी नित्ययुक्त हा भास नाहीं ११३
( ५ ) ज्ञानी नित्ययुक्त असून भक्त ११४–११६

× दृष्टांत–वायु–आकाश
ज्ञानी शरीरद्वारा कर्म करतो तेव्हां
भक्त. बाकी मद्रूप

( ६ ) श्लोक उत्तरार्धभाग व पुढील
श्लोकप्रस्ताव एकत्र ११७–११८

श्लो. १८ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध ११९–१२३

× उदाराः सर्व एवैते हा भाग गाळला
ज्ञानी भक्त अधिक आवडण्याचें
कारण दूध गाय वत्स दृष्टांतानें

( २ ) श्लो. उत्तरार्ध १२४–१२६

श्लो. १९ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १२७-१३२

× अनेक जन्मांच्या साधनेचा क्रम –
१ विषय व कामक्रोध टाळणें

---

## अध्याय ८

× या अध्यायाला प्रस्तावना
नाहीं. अर्जुनभाग्यनिमित्तानें ही एक
प्रस्तावना च झाली.

---

श्लो. ३ — ( १ ) श्री भगवानुवाच + अक्षरं १५

( २ ) ब्रह्म परमं १६–१७

परम = अगदीं सूक्ष्म

( ३ ) स्वभावोऽध्यात्ममुच्यते १८–१९

× आकारोत्पत्तिलोपानें उत्पत्ति –
विनाश नाहीं असें सहजस्वरूप तें अध्यात्म

( ४ ) श्लोकउत्तरार्ध २०–२९

× मूळ शून्य. अंतीं शून्य. मध्यें
भासते. कर्ता हि दिसत नाहीं असें
जें तें " कर्म "

---

श्लो. ४ — ( १ ) अधिभूतं क्षरो भावः ३०–३३

( २ ) पुरुषश्चाधिदैवतम् ३४–३६

× १ प्रकृति उपर्जित भोक्ता
२ चेतन, जीव
३ परमात्मा च परंतु भ्रांत

( ३ ) श्लो. उत्तरार्ध ३७–५३

१ शरीरांत शरीरबुद्धिलोप
करणारा तो अधियज्ञ

२ अधिभूत अधिदैव हें
हिणकसाशीं मिसळलेलें. हिणकस गेल्यावर
ब्रह्माशीं ऐक्य ज्या ठिकाणीं घडतें तो अधियज्ञ.

३ सर्व यज्ञ कर्मज हे पूर्वोक्त हा
आतां नैष्कर्म्यठेवा यज्ञ.

× यज्ञाचें रूपक योगसाधनस्वरूपांत

श्लो. १० — ( १ ) प्रयाणकाळे मनसाचलेन भक्त्या ९१

( २ ) योगबलेन चैव ९२

× सद्दाव्या अध्यायांतलें वर्णन
येथें अतिसंक्षिप्तरूपांत
१ उत्तराभिमुख पद्मासन
२ कर्मयोगसुख केंद्रीकरण
३ एकाग्रमन
४ स्वरूपप्राप्तिप्रेम
५ सुषुम्नामार्गानें ब्रह्मरंध्राकडे
६ प्राणवायु महदाकाशांत

( ३ ) मनसा चलेन भक्त्या युक्तो योगबलेन
इ. उपसंहार ९६

( ४ ) भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् ९७

× जडाजडांना एकत्र करीत
घंटानाददृष्टांतानें भ्रूसंगमांतली
एकाग्रता.

( ५ ) स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ९८–९९

× देह ठेवतो दृष्टांत घटस्थदीप

---

श्लो. ११ – ( १ ) यदक्षरं वेदविदो वदंति १००–१०३
वदंति म्ह. जाणतां येत नाहीं
असें म्हणतात.

( २ ) विशंति यद्यतयो वीतरागाः १०४–१०५

× निरिच्छांना हि इच्छा–विरोधाभास

( ३ ) यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति १०६

( ४ ) तत्ते पदं १०७

( ५ ) संग्रहेण प्रवक्ष्ये १०८–११०

× खरी स्तुति इ. — मौन — स्तुति,
कर्माभाव — पूजा, लय — सान्निध्य

( ५ ) गीतार्थविवेचनार्थ प्रार्थना. त्यावर
गुरुवार. तो च प्रसाद. ग्रंथविवरणारंभ २७-२९

( ६ ) सबंद गीतामंदिराचा १८ वा अध्याय
हा कळस ३०—४४

१ × कळस म्हणजे पूर्णता. या अर्थानें
१८ वा अध्याय सर्वगीतार्थविवेचक
रूपकः— गीता — रत्नप्रासाद
१८ अध्याय — अर्थरूप चिंतामणिकळश

× लौकिक रूढीनें १८ वा अध्याय
गीतार्थविवेचक
देवळाचा कळस पाहिला कीं
देऊळ पाहिलें,
पंढरपूरची ही रूढी ?

२ सबंद गीतामंदिररूपक—
व्यास — मंदिर बांधणारे ( सूत्रकार )
वेद — रत्नगिरि
उपनिषदें — वेदरत्नागिरीवरील माळजमीन
( खणून साफ केलेली )
धर्मार्थकाम — खणतांतले दगडगोटे
महाभारत — या दगडांचा जमिनीभोंवतीं
बांधलेला प्राकार
आत्मज्ञान — उत्तम चिरे
कृष्णार्जुनसंवाद — चिऱ्यांची बढण

निवृत्ति – दारी

सर्व शास्त्रें – पूरणी ( घर )

मोक्षमर्यादा – आकार

१५ अध्याय – १५ मजले

१६ वा अध्याय – घुमटाच्या
गळमण्याचा घाट

१७ ,, ,, – कळसाची बैठक

१८ ,, ,, – कळस

व्यासकृत गीता – ध्वज

इतर अध्याय तुलना—

इतर अध्याय मजले – १८ वा त्यांचें पूर्णत्व

,, ,, ,, प्रकटत्व

( ७ ) गीतामंदिरांत भिन्न अधिकारी असा

सर्वांना सारखाच लाभ ४५–४९

भिन्न अधिकारी—

पाठक – बाहेरून प्रदक्षिणा करणारे

श्रावक – आंत बसणारे

अर्थज्ञ – गाभाऱ्यांत शिरणारे

अर्थज्ञान्यांना परमेश्वराशीं सारूप्य

तरी सर्वांना च सारखा मोक्ष. दृष्टांतः—

थोरांकडील जेवणाची पंगत

( ८ ) सबंद गीतेंत श्लोक अध्याय वेगळे तरी

अर्थ एक च ५०–५९

वेगळेपणा चरणभेदानें व अध्यायक्रमानें च

फक्त. दृष्टांत— ५०–५४

१ गंगायमुनेचें पाणी

कारण १ – प्रेमाची रीत – प्रेमाला पुरें
असें कधीं वाटत नाहीं. दृष्टांत –
वासरूं – गाय.
कारण २– ज्ञानसुखानुभव थांबल्यामुळें
पुन्हां सुरूं करण्यासाठीं. दृष्टांत– आरसा

× अर्जुनप्रश्नानें १८ व्या अध्यायाच्या
निमित्तानें सबंद एकाध्यायाची गीता
पुन्हां सुरूं झाली. दृष्टांत –
१ वासरूं – पान्हा, २ सेवकशब्द – धनी

---

श्लो. १ –– ( १ ) अर्जुन उवाच ८६
( २ ) सर्व श्लोक ८७–८९

× त्याग संन्यास एक च. फक्त
शब्दभेद. दृष्टांत – संघ - संघात
पृथक जाणण्याच्या इच्छेनें अर्जुनाकरवी
ज्ञानदेवांनीं उलट भूमिका घेवविली.

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव ९०–९७
भगवंतांचे उत्तर –
१ अर्जुनम्हणणें एकापरी मान्य
( कारण त्यागसंन्यासांत टाकणें हें एक तत्व )
२ परंतु त्यागसंन्यासांत भेद ९१
स्वरूपतः कर्मत्याग = संन्यास
कर्मफलत्याग म्ह. परिणामतः कर्मत्याग
= त्याग
सर्वथैव कर्मत्याग म्हणजे काम्य
कर्मांचा सर्वथैव त्याग कारण काम्य
कर्म स्वाभाविक नाहीं. दृष्टांत –

१ रानांतलीं झाडें — बागेंतलीं झाडें
२ गवताची वाढ — भातशेती
३ नदी आयती — विहीर खणावी लागते.

---

श्लो. २ — (१) श्लो. पूर्वार्ध ९८–१०९

१ काम्य कर्में ९८–९९

२ काम्य कर्मांचें फळ १००–१०३

भोगावें च लागतें दृष्टांत—
देहांत जन्ममृत्यु
कपाळींचें लिखित
जन्मसिद्ध कातडीचा रंग, कर्ज

३ कामना न धरतां हि सहज जरी काम्यकर्म घडलें तरी त्याचें बंधक फळ टळत नाहीं.

दृष्टांत —
खोट्या लढाईंत बोथट बाणाची हि जखम
न कळत तोंडांत घातलेला गूळ
राखुंडी समजून तोंडांत निखारा

४ काम्य कर्में विषवत् ओकून टाकणें १०६–१०८

५ काम्य कर्में मोडणें म्हणजे कामना च सोडणें. दृष्टांत – वाटसरू द्रव्यत्यागानें लुटारूची भीति सोडतो.

(२) श्लो. उत्तरार्ध ११०–१३४

× सर्व कर्में = नित्य नैमित्तिक

१ नैमित्तिक कर्में ११०–१११

ग्रहणपर्वप्रसंगीं करणीय
श्राद्धादि ,, ,,
अतिथि ,, ,,

२ नित्यकर्माला च प्रसंगानें— मुळच्यांत
बाढ होऊन नैमित्तिकत्व येतें.

दृष्टांत — ११२--११४

१ पावसाळ्यांतलें क्षुब्ध आकाश
२ वसंतांतलें -- रान
३ तारुण्यांतली -- देहावस्था
४ चंद्रकिरणांनीं - चंद्रकांतपाझर
५ सूर्योदयानें -- कमळविकास

३ नित्य कर्म ११५--११७

× नित्यकर्म म्हणजे प्रातर्मध्याह्नसायंकाळीं
करावें लागणार रोजचें कर्म
नित्यकर्म म्हणजे स्वाभाविक कर्म, दृष्टांत--
१ डोळ्यांची दृष्टि
२ पायांची गतिशक्ति
३ दिव्याचें तेज
४ चंदनांत गंध

४ नित्यकर्म नित्य करावें लागतें
म्हणून तें निष्फळ किंवा
वांझ नव्हे ११८--१२२

× नित्यकर्माचें फळस्वरूप
दोष नष्टता, अधिकारवर्धन, सद्गतिप्राप्ति
दृष्टांत — १ जेवणें = क्षुधानाश
\+ समाधान = नवदेहप्राप्ति
२ सोनें तापविणें
हिणकसनाश + कसवर्धन = नव —
मूल्यप्राप्ति

५ सर्वकर्मफलत्याग १२२-१२५

× नित्यनैमित्तिक कर्मांच्या फळाचा
त्याग उचित – दृष्टांत –
मूळनक्षत्रावरील मूल, वसंतसमयींचा
आंब्याचा मोहर.

× नित्यनैमित्तिक कर्में कर्तव्य परंतु
त्यांचें फळ त्याज्य – दृष्टांत ओंकारी
प्राहुस्त्यागं विचक्षणाः १२६

( ३ ) संन्यासत्यागपारिणाम १२७-१३०

× काम्यनिषिद्धनित्यकर्मनाश =
आत्मज्ञानसाधनप्राप्ति.

( ४ ) पुढील श्लोकप्रस्ताव – संन्यास १३१-१३४
त्यागयुक्तीशिवायचा त्याग बंधक
दृष्टांत – १ चिकित्सेविना औषध
२ अन्नत्याग

× त्यागयुक्ति – त्याज्य लोभ नको
अत्याज्य त्याग नको

× त्यागयुक्ति चुकली तर सर्वस्वत्याग
हि व्यर्थ.

---

श्लो. २ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १३५-१३७

× कर्मफळलोभ टाकतां येत नाहीं
म्हणून सर्व कर्म च त्याज्य म्हणणाऱ्या
लोकांना दृष्टांत –
१ नागवा – जग भांडखोर म्हणतो
२ जिह्वालोलुप – अन्नाला नांवें ठेवतो

कुष्ठ रोगी – माशांवर रागवतो

× मुळांत अशा मतवाद्यांना 'मनीषी' म्हटलें आहे. तिकडे दुर्लक्ष करून ज्ञानदेवांनीं टीका केली आहे.

( २ ) श्लो. उत्तरार्ध १३८–१४२

× अन्य मतवाद्यांचें म्हणणें चित्तशुद्धीला दुसरें साधन नाहीं म्हणून यज्ञदानतपें त्याज्य नाहींत. दृष्टांत—

१ मार्गक्रमणार्थ - कर्मरूपी पहार

२ सुवर्णशुध्यर्थ – विस्तव

३ आदर्शशुध्यर्थ – राख

४ वस्त्रशुध्यर्थ – परठाचें सतेलें

५ पक्वान्नार्थ – स्वयंपाक

× मुळांत चित्तशुध्यर्थ हीं कर्मं असें नसून केवळ मोघम हीं कर्मं त्याज्य नव्हेत एवढें च म्हटलेलें आहे.

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव १४३–१४४

× मतभेदामुळें हा त्यागविषय संशयित झालेला आहे.

---

श्लो. ४ – ( १ ) श्लो. उत्तरार्ध १४५

( २ ) श्लो. पूर्वार्ध १४६–१४७

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव १४८

---

श्लो. ५ – ( १ ) श्लो. पूर्वार्ध १४९–१५३

× यज्ञदानतप अवश्यक ( आत्मज्ञान ठसकें नाहीं तोंपर्यंत– ज्ञानदेवाचें स्पष्टीकरण )

दृष्टांत—

१ प्रवासी – चाळणें बंद न करणें

२ हरवलेली वस्तु – सांपडेपर्यंत
शोध न सोडणें.

३ भूक पुरी होईपर्यंत – ताट दूर न सारणें

४ थडीला पोंचण्यापूर्वीं – नाव न फोडणें

५ प्रसवण्यापूर्वीं – केळ न तोडणें

६ ठेवलेली वस्तु — दिसण्यापूर्वीं
दिवा न मालवणें.

( २ ) श्लो. उत्तरार्ध १५४–१६५

× यज्ञादि – निष्ठापूर्वक आचरलीं
तर कर्में मनःशुद्धि करतात
म्हणजे रजतम झाडून टाकतात
व सत्वाचा लाभ करून देतात १५४–१५६

दृष्टांत—

१ वाटसरूचें पाऊल – विश्रामकारण

२ औषध घेणें – रोगनाशकारण

३ सोन्यावर क्षारपुटें – हीणकसनाशकारण

× कर्मांना तीर्थत्व ( महत्व ) येण्याचें कारण
मनःशुद्धि दृष्टांत— १५८–१६०

बाह्यमळ – तीर्थानें

अंतर्मळ – कर्मानें

कर्म ( बंधक मानलेलें ) पण तेंच
युक्तीनें बंधननिवारक होतें
( पुढील श्लोकप्रस्ताव )
दृष्टांत— १६१–१६४

१ उन्हाच्या झळईनें च अमृतपान
२ आंधळयाच्या डोळयांत सूर्य
३ नदीनें च बुडणाऱ्याला सांवरणें
४ मृत्यूनें च वाढतें आयुष्य देणें
५ रसायनानें मरणाऱ्याला विषानें
वाचविणें

× कर्मबंधानिवारणयुक्ति पुढील श्लोकांत १६५

श्लो॰ ६ — (१) एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा १६६–१७०

× संग = अहंकार
कर्तृत्वाहंकारत्यागदृष्टांत —
१ भाडोत्री होऊन तीर्थाला जाणें
२ समर्थाज्ञेनें राजाला पकडणें
३ दुसऱ्याच्या कच्छानें तरणें
४ यजमानार्थ दुसऱ्याला दान देणें

(२) फलानि च १७१–१७४

फलत्यागदृष्टांत —
१ दाईचें दूध पाजणें
२ पिंपळाला पाणी घालणें
३ गुराख्याचें गाई राखणें

(३) श्लो॰ उत्तरार्ध १७५–१७७

श्लो॰ ७ — (१) सर्व श्लोक १७८–१८३

× मोहात् = कर्माचा बंध कर्मानें च
उडवावा हें न जाणतां कर्म बंधक
आहे म्हणून सर्व च कर्मे टाकून
देणें — त्यामुळें बंध टळेल या भ्रमानें.

दृष्टांत—

१ अंधारावर रागाऊन डोळे फोडणें

२ डोकेदुखीमुळें – डोकें च तोडणें

३ वाट अवघड म्हणून – पाय तोडणें

४ आवडीचें अन्न नाहीं म्हणून
– उपवास करणें

---

श्लो. ८ — ( १ ) दुखःमित्येव यत्कर्म १८४–१८८

× कर्माची आरंभाची बाजू कांहीं
काळ दुःखद असतें. दृष्टांत—

१ अन्नाची शिदोरी नेतांना जड

२ निंब आरंभी कडू

३ हिरडा ,, तुरट

४ ( दूध काढण्यापूर्वी ) गाईचें शिंग
घातक

५ ( फूल काढतांना ) काटे शेवंतीला
काटेरी अंग

६ भोजनापूर्वी – स्वयंपाकाची दगदग

( २ ) कायक्लेशभयात् त्यजेत् १८९–१९१

× कायक्लेशभयानें कर्म न करणें
नव्हे तर सुरवात करून तें सोडणें

× कर्मफळ मागाहून. कर्मत्रास आधीं
तो भोगण्यापेक्षां प्रत्यक्ष भोगतां
येतील ते भोग भोगावे. कर्मारंभ
सोडण्यांतलें तत्त्वज्ञान.

(३) स कृत्वा राजसं त्यागं १९२

(४) नैव त्यागफलं लभेत् १९३-१९५

× या कर्मत्यागाचें त्यागफल नाहीं. दृष्टांत-

१ उतूं गेलेलें दूध — हवन द्रव्य नाहीं.

२ बुडून गेल्यानें — जलसमाधि नाहीं.

(५) आत्मज्ञानानें कर्मलोप होतो तेव्हां कर्मत्यागफल मिळतें. दृष्टांत- १९६-१९७

सूर्योदयानें तारकालोप

(६) पुढील श्लोकप्रस्ताव १९८-१९९

× राजसत्यागानें मोक्षफल नाहीं. म्हणून मोक्षफलदत्याग पुढें सांगावयाचा.

---

श्लो. ९ — (१) थोडक्यांत सर्व श्लोक २००-२०१

(२) × कर्मांत अहंकार व कर्मफललोभ बंधक म्हणून तें त्याज. कर्म सेव्य.

दृष्टांत — २०२-२०६

१ आईचा तिरस्कारकाम त्याज्य आई सेव्य

२ गाईचं तोंड अपवित्र म्हणून गाय त्याज्य नाहीं.

३ साली अठळी त्याज्य — फळ सेव्य

४ मुलींविषयीं काम त्याज्य

(३) स त्यागः सात्त्विको मतः २०७-२११

१ कर्मबंधकत्वनाश दृष्टांत — भाजलेलें बीं

२ रजतमनाश — दृष्टांत — परीस

३ आत्मज्ञानलब्धि व विश्वसंभ्रमनाश

दृष्टांत— १ सायंकाळीं मृगजळ

२ पोकळ आकाश

---

श्लो. १० — (१) श्लो. पूर्वार्ध २१२–२१७

(मेधावी छिन्नसंशयः गर्भित)

× कारण १ –

सुखःदुःखाविषयीं योग्य दर्शन (मेधावी)

दृष्टांत – ढग – आकाश २१२–२१३

कारण २:—

सुखदुःखें मिथ्या (छिन्नसंशयः) दृष्टांतः—

स्वप्न २१४--२१५

(२) त्यागी सत्वसमाविष्टः २१६

(३) उपसंहार २१७

---

श्लो. ११ — (१) श्लो. पूर्वार्ध २१८–२२६

× देहांत स्वरूपतः कर्मत्याग अशक्य.

कारण १ -- देह च कर्मस्वरूप.

दृष्टांत—

१ मृत्तिकात्याग – घडा

२ तंतुत्याग – पट

३ उष्णतात्याग – आग

४ घाणीचा त्याग – हिंग

५ द्रवत्वत्याग – पाणी

६ टिळा लावणें – कपाळ लावणें

पुसणें पुसणें

कारण न करणें हि कर्म होतें.

( २ ) श्लो. उत्तरार्ध २१७–२३२

× कर्मत्याग – कर्मफलत्याग

फलत्याग – ईश्वरार्पण कर्म

ईश्वरार्पणानें – बोधप्राप्ति

बोधानें – अज्ञानासह कर्मनाश

हा च कर्मत्याग.

× केवळ कर्मत्याग हा कर्मत्याग नव्हे

दृष्टांत – मूर्च्छा – निद्रा

एक कर्म सोडून दुसरें करणें

हा हि कर्मत्याग नव्हे. दृष्टांत –

दांडकें चुकविणें, बुक्के सोसणें

---

श्लो. १२ — ( १ ) त्रिविधं कर्मणः फलं भवति

अत्यागिनां २३३

( २ ) भवति अत्यागिनां न तु

संन्यासिनां क्वचित् दृष्टांत — २३४–२३८

१ कन्येचा पिता मोकळा जांवई बद्ध

२ विषारी वनस्पति विकणारा मोकळा

सेवन करणारा मरतो

× कर्मफळ जो घेईल त्याला मिळतें

दृष्टांत— रस्त्यावरील अंब्याचें फळ

× कर्म कर्त्याचें कर्तृत्व व अकर्त्याचा

फलत्याग दोहोंला कांहीं करूं शकत

नाहीं.

( ३ ) अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधः

कर्मणः फलं २३९–२४७

× त्रिविध जग हें कर्मफळाचें
प्रकारस्वरूप २३९

+ कर्माचें अनिष्ट-फल २४१–२४२
विषयबुद्धि, अधमप्रवृत्ति,
निषिद्धकृत्यकरण. याचा परिणाम–
कीटकादि हीनयोनिप्राप्ति
कर्माचें इष्ट फळ २४३–२४४
स्वधर्मादर, पुण्याचार तद्द्वारा
इंद्रादि देवपदलाभ

× कर्माचें मिश्र फळ २४५–२४७
शुभाशुभकर्मफळाच्या सममिश्रणानें मनुष्यदेह
हें मिश्रफळ. शुभाशुभमिश्रणाला दृष्टांत–
१ गोड + आंबट = तृतीय स्वादिष्ट रस
२ रेचक + कुंभक = ,, अवस्था (?)
३ सत्य + असत्य = ,, एक (?)

(४) भवत्यत्यागिनां प्रेत्य २४८–२५६

× कर्मे आचरतांना अहंकार होतो. पण तो
परिणामीं घातक. दृष्टांत—
१ दुष्ट पदार्थ खातांना गोड परिणामीं मरण
२ ठकाची मैत्री चांगली – रान येईपर्यंत
३ वेश्यासौंदर्य – अंगस्पर्शी घातक

× कर्मफळभोग अंतीं चुकविणें शक्य नसतें.
दृष्टांत— सावकाराला टाळणें अशक्य.
एक कर्मफळभोग जीव भोगतो त्या च वेळीं
दुसऱ्या कर्मफळांची तयारी चालकेली असते.
फलाशा धरणाऱ्याच्या फळभोगाचा अंत च

येत नाहीं. दृष्टांत—

१ कणसाचा दाणा रुजून पुन्हां रोप

२ चालतांना प्रत्येक पाऊल मागच्याच्या पुढें च

३ नदी उतार करणाऱ्या तरीला प्रत्येक तीर पलीकडचें च.

(५) न तु संन्यासिनां क्वचित् २५७–२७५

× कर्माला निमित्तमात्र होऊन त्याचें कर्तृत्व जे घेत नाहीत. त्याचें त्रिविध कर्मफल नष्ट होऊन त्यांना अद्वैतप्राप्ति.

दृष्टांत—

१ जाईच्या पाकळ्यांचें फाकणें व सुकणें

२ बीसाठीं ठेवलेलें धान्य पोटगीला गेलें कीं शेती बंद

× अद्वैतप्राप्ति झाल्यावर फळभोगाच्या रूपानें कर्माची बाधा चालत नाहीं.

दृष्टांत— २६२–२६७

१ भिंत पडली कीं चित्र गेलें

२ रात्र गेली कीं अंधार गेला.

३ वस्तुरूप गेलें कीं सावली गेली.

४ आरसा गेला कीं प्रतिबिंब गेलें

५ झोंप गेली कीं स्वप्न गेलें

× अहंभाव कर्माच्या ठिकाणीं आहे तोपर्यंत दृष्टींत भेद रहाणार च. आत्मा आणि कर्म यांत भेद. दृष्टांत— २६९–२७५

१ पूर्वदिशापश्चिमदिशा भेद

कारण ४ — जागृतिस्वप्नादिअवस्थांना
आधारस्थान म्हणून

( ३ ) कर्ता ३२१-३२६

× जीवात्मा हा च कर्ता. जीवात्म्याचें स्वरूप—
१ चैतन्यप्रतिबिंब दृष्टांत— आकाश
२ आत्मस्वरूपविस्मरणानें देहाभिमानरूप
दृष्टांत— राजाचा स्वप्नस्थ रंकपणा.
३ देहाबरोबर राहणारा.
४ प्रकृतीकडून घडणारीं कर्में भ्रमानें
'मी' केलीं समजणारा.

( ४ ) करणं च पृथग्विधं ३२७-३३१

× एक च बुद्धिशक्ति भिन्न इंद्रियद्वारांनीं
प्रकट होते. या इंद्रियांना च पृथग्विध
करणनाम. दृष्टांत—
१ एक च दृष्टि — पापण्यांमुळें भिन्न
२ एक च दीपप्रकाश— खिडक्यांमुळें भिन्न
३ ,, पुरुष— शृंगारादिरसांनीं वेगळा

( ५ ) विविधाश्च पृथक्चेष्टा ३३२-३४३

× एक च असलेली पण निरनिराळ्या
प्रकारांनीं भिन्न झालेली वायुशक्ति
ह्या च पृथक्चेष्टा. दृष्टांत—
नदीनदपाणी. वायुक्रियांचें वर्णन—
बोलणें, घाकणें, घेणें, देणें इ. इ. इ.

( ६ ) दैवं चैवात्र पंचमम् ३४४-३५१

× सर्व वृत्तिवैभवांत बुद्धि प्रधान.
बुद्धीला प्रौढी देणारीं इंद्रियें.
इंद्रियांना प्रौढी प्राप्त होण्याला

त्या त्या इंद्रियांचें दैवत सूर्य इ.

हें अधिदैवत हें पंचमकारण.

दृष्टांतमाला —

१ शरदृऋतु — चंद्र — पौर्णिमा

२ वसंताराम — प्रियसंगम उपचार

३ कमळ — विकास — परागांचा भर

४ कवित्व — रसिकत्व — परतत्त्वस्पर्श

( ७ ) प्रस्तुत श्लोकोपसंहार पुढील श्लोकोपक्रम

३५२–३५३

---

श्लो. १५ — ( १ ) शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते

नरः २५४–३५८

× मन वाचा शरीर असा क्रम बदलून घेतला

+ प्रथम मनानें संकल्प, वाणीनें त्याची

स्पष्टता, शेवटीं देहानें कर्म — असा

कर्मक्रम, दृष्टांत—

१ वसंत - पालवी - पुष्प - फळ

२ पावसाळा - ढगें - पाऊस - धान्य

३ पूर्वदिशा - अरुण - सूर्योदय - दिवस

( ४ ) पंचैते तस्य हेतवः ३५९-३६५

× शरीरादि समुदाय च शरीरादि

समुदायाला हेतु. दृष्टांत—

१ लोखंडी घडकाम — लोखंडी घणानें

२ तंतूचा ताणा — तंतूच्या बाण्यानें

३ रत्नांचा दागिना — रत्नांनीं च

× कर्माला कारण व हेतु एक च

याला दृष्टांत—

१ सूर्यप्रकाश -- हेतु व कारण सूर्य

२ उसाचें कांडें – वाढीला हेतु व कारण

( ३ ) न्याय्यं वा विपरीतं वा ३६६–३७७

× शरीरादि कारणांचा शरीरादि हेतूंशीं मेळ झाल्यानें जें कर्म उभारतें त्याचा शास्त्रोक्त मार्गाशीं मेळ पडला तर तें न्याय्य कर्म होतें. दृष्टांत–

१ पावसाळ्याचा लोट – भाताच्या खाचरांत

२ रागानें निघालेला – द्वारकेच्या वाटेवर.

× शास्त्रावांचून केलेलें कर्म निष्फळ. दृष्टांत –

१ दूध वाढतांना सांडलेलें दूध

२ लुटारूंनीं नेलेलें धर्मादायखातें जमा होऊं शकत नाहीं.

३ बावन अक्षरें उच्चारून मंत्रफलप्राप्ति नाहीं.

+ शास्त्राची कास न धरणारें कर्म अन्यायकर्म

श्लो. १६ —— ( १ ) केवलं आत्मानं ३७७–३८०

× आत्मा कर्मांचा कर्ता न होतां कर्म प्रकट करतो. दृष्टांत ——

१ सूर्य कोणतें हि रूप न होतां डोळे व वस्तूचीं रूपें प्रकट करतो.

२ पाहणारा – आरसा व प्रतिबिंब न होतां दोघांना प्रकाशित करतो.

३ सूर्य – दिवसरात्र न होतां दोघांना निर्माण करतो.

( २ ) अकृतबुद्धित्वात् न स पश्यति ३८१

( ३ ) दुर्मतिः आत्मानं कर्तारं पश्यति ३८२-३९४

× आत्मानं = देहं

देहाला च आत्मा मानणाऱ्याला दृष्टांत –

१ घुबड दिवसाची रात्र करतो

२ सूर्य न पाहिलेला प्रतिबिंब च सूर्य मानतो.

३ कावीळ झालेल्याला चंद्र पिंवळा

४ मृग मृगजळाला भुलतात

५ निद्रिताला स्वप्न खरें वाटतें.

६ दोराचें ज्ञान नाहीं तो त्याला सर्प मानतो

७ अभ्राची गति कोल्हे चंद्रावर आरोपतात.

८ शुक नळिकेला भुर्लानें जखडला जातो.

दुर्मतिः– १ शास्त्र आणि गुरू यांचें २९०

२ मूर्खपणानें च जगतो.

( ४ ) पुढील श्लोकप्रस्ताव ३९५–४०२

× कर्मांत वागून पुन्हां अलिप्त

असणाऱ्याची ओळख ४०१–४०२

कर्मांत अलिप्ततेला दृष्टांत— वडवानल

मुक्तांच्या लक्षणांचा विचार करतां

करतां मुक्तता लाभते ३९७–४००

दृष्टांत—

१ दिव्याच्या उजेडानें हरवलेली वस्तु प्राप्त

२ आरसा उटावा तों तों स्वरूप स्पष्ट.

३ पाण्याच्या संगानें मीठ जलरूप

४ प्रतिबिंब बिंबाकडे आलें कीं बिंबरूप

---

श्लो. १७ — ( १ ) यस्य नाहंकृतः भावः ४०३–४०८

× अनहंभावापूर्वीची स्थिति ४०३–४०५

१ तत्त्वमसि सिद्धांतश्रवण

२ गुरुकृपा

३ मायानिद्रानाश व अभेदानंदजागृति

× अभेदभावप्राप्त पुरुषाच्या ठिकाणीं अहंभाव उरत नाहीं. दृष्टांत— ४०६–४०८

१ चंद्रोदयानंतर मृगजळ

२ बाळपणानंतर बागुल

३ जळण संपल्यानंतर जळणें

( २ ) बुद्धिर्यस्य न लिप्यते ४०९–४२१

× बुद्धि कर्मांत लिप्त होत नाहीं. दृष्टांत—

४०९–४१२

१ सूर्याला अंधार मिळत नाहीं

२ अग्नि ज्या ज्या वस्तूला लागतो ती तद्रूप

बुद्धि देहांत लिप्त होत नाहीं ४१२–४२१

दृष्टांत—

१ प्रलयकाळचें पाणी ओढ्याच्या आहारीं जाणें अशक्य

२ सूर्यबिंब सूर्याला झांकणें अशक्य

३ लोणी ताकांत मिसळणें अशक्य

४ काष्ठगत अग्नि काष्ठापासून वेगळा झाल्यावर तो काष्ठांत राहणें अशक्य.

५ रात्रींमधून निघणारा सूर्य रात्र होणें अशक्य.

६ कारणें — भेदभावनष्टता बुद्धि कर्मांत लिप्त होत नाहीं ( पुन्हां विवेचन ) ४१९-४२१

सर्वत्र आत्मस्वरूपता. पूर्ण कर्मनष्टता, दृष्टांत—

१ आकाशाला वसतिस्थान नाहीं.

२ समुद्राला प्रवाह नाहीं.

३ ध्रुवाला गति नाहीं.

( ३ ) देहाभिमान गेलेल्या पुरुषाच्या ठिकाणीं देहनिमित्तानें कर्म चालतांना दिसतें याचें कारण पूर्वीची अहंतावश येतील मिळालेली गति. दृष्टांत— ४२२-४१८

१ वारा गेला तरी झाड थोडें हालतें

२ कापूर संपला तरी करंडीला वास.

३ गाणें संपले तरी तंद्री उरते

४ सूर्य मावळला तरी संध्या राहते

५ लक्ष्यभेद झाला तरी बाण पुढें पडतो

६ घडा काढला तरी कुंभाराचें चाक पूर्वीच्या गतीनें चालतें.

( ४ ) हीं ज्ञान्याचीं देहाकडून होणारीं कर्में आत्म्यानें कांहीं न करतां परभारे पांच हेतु व पांच कारणांनीं घडतात दृष्टांत— ४२९-४३१

१ मनांत कांहीं नसतां स्वप्न

२ लावणीशिवाय रानांत झाडें

३ रचल्याशिवाय ढगांच्या इमारती

( ५ ) हत्वापि स इमांल्लोकान् न हंति ४३२-४३६

× हत्वापि इमांल्लोकान् ही एक बाजू झाली. ज्ञानेश्वर दोन्हीं बाजू मांडतात १ लोकनाश २ लोकसंभव दृष्टांत—

१ सूर्य — कमलविकास कुमुद सुकणें

२ आकाश — विजांचा वर्षाव पर्जन्यवर्षाव

( ६ ) न निबध्यते ४३७-४४३

× देहलिप्त पुरुषांना ज्ञानी कर्मांत
गुतलेला अज्ञानानें दिसतो. ज्ञान्याला
त्याचें कांहीं च नसतें. दृष्टांत—
१ शेतकऱ्याचें बुजगावणें कोल्ह्यांना
२ वेड्याचें नेसलें. नागवेपण इतरांना
३ युद्धांत मेलेल्याच्या जखमा – इतरांना
४ सतीचें दिव्य – इतरांना
५ पाण्याचा लोंढा

( ७ ) हत्वाऽपि न निबध्यते ४४४-४४५

× सामान्य कर्मलिप्तता तर नाहीं च
पण असामान्य वाटणाऱ्या हननादि
क्रियांनीं हि लिप्तता नाहीं. कारण
सर्वत्र आत्मस्वरूपता. त्यामुळें ज्ञानी
या क्रिया करतो हा भास. यांत
सत्य नाहीं. दृष्टांत—
१ सोन्याची महिषासुरमर्दिनी
२ चित्रांतील आग
ज्ञान्याच्या सर्वत्र एकरूपतेला दृष्टांत—
१ अंधार उजेडानें पाहणें
२ गंगेला मिळालेली नदी
३ अग्नीचा अग्नीशीं झगडा
४ शस्त्राचा स्वतःवरच आघात
× ज्ञानी पुरुषाची सर्वत्र आत्मरूपता
म्हणजे कार्य, कर्ता, क्रिया तीन्ही
त्याला आत्मरूप.

× ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान ही च त्रिपुटी
कर्मप्रेरक.

\+ ज्ञेय शब्दादिविषयांनीं पंचधा
पण तें प्रिय किंवा अप्रिय असें
एकरूपी.

× ज्ञाता ज्ञेयाचें इतकेंस ज्ञान झाल्या-
बरोबर तें स्वीकारण्यास ( प्रिय असल्यास )
किंवा टाकून देण्यास ( अप्रिय असल्यास )
तयार होतो. म्हणजे ज्ञेयदर्शन झाल्याबरोबर
ज्ञाता तिकडे धाव घेतो. दृष्टांत—

१ मासा पाहून बगळा
२ द्रव्य ,, दरिद्री
३ स्त्री ,, कामुक
४ उतार ,, पाणी
५ पुष्प ,, भुंगा
६ धारेची वेळ पाहून वासरूं
७ स्वर्गांतील गोष्टी ऐकून याज्ञिक
८ पारवी पाहून पारवा
९ ढगांचा शब्द ऐकून मोर

× ज्ञेय प्रिय असेल तर ज्ञाता त्याचा तत्क्षणीं
उपभोग घेण्याला विलंब लावीत नाहीं. ज्ञेय
अप्रिय असेल तर त्याला टाळण्याला जो
वेळ लागतो तो त्याला युगाप्रमाणें दीर्घ
वाटतो. ज्ञेय प्रियअप्रिय मिश्र असल्यास
त्याची मिश्र मनोवृत्ति होते. दृष्टांत—
सर्प व हार.

( ६ ) कर्ता ४९०-५०५

× ज्ञाता च ज्ञेयविषयत्याग स्वीकारार्थ
इंद्रियसमूहाला राबवतो तेव्हां कर्ता बनतो.
दृष्टांतः— ४९०-४९३
१ जेवणारनें च अन्न रांधावें
२ भुंग्यानें च मळा करावा
३ सोने पारख्यानेंच कसोटी व्हावे
४ देवानें च देवळाचें काम करावें

+ ज्ञात्याच्या कर्तृत्वावेशाला दृष्टांत—
प्रतिमल्ल पाहून मल्लाचा आवेश

× ज्ञाता कर्ता झाला की त्याच्यांत
एकदम पालट होतो. दृष्टांत ४९४-४९६
१ रात्रीं डोळे मिटणें
२ नशीब फिरलें कीं, श्रीमंती गेली.
३ पौर्णिमेनंतर चंद्रबिंबपालट

( ७ ) करणं ५०६

× कर्ता इंद्रियांचें साह्य घेतो त्यामुळें
इंद्रियें करण

( ८ ) कर्म ५०७

× कर्त्याच्या क्रियांनीं व्यापलें जातें तें
कर्म दृष्टांत—
१ सोनाराची बुद्धि लेण्याला व्यापते
२ चंद्रकिरण चांदण्याला व्यापतात
३ प्रभा प्रकाशाला व्यापते
४ गोडी उसाच्या रसाला व्यापते
५ अवकाश अवकाशानें व्यापतो.

(९) श्लोकाचा उपसंहार ५०८–५१६

× कर्ता, क्रिया, करण यांत कर्माची साठवण दृष्टांत—

अग्नींत – धूर

बीजांत – वृक्ष

मनांत – वासना

सोन्याच्या खाणींत – सोनें

---

श्लो. १९ – (१) श्लो. पूर्वार्ध ५१७

(२) केवळ ज्ञान कर्म कर्ता विश्वासार्ह नाहीं. त्यांत सात्विक निवड करावी लागेल.

(३) श्लो. उत्तरार्ध ५१८–२३

× सांख्यशास्त्रगौरव –

१ विचारसागर

२ आत्मबोधदायक

३ शास्त्रसम्राट

४ प्रकृतिरूपदर्शक

५ अज्ञानमापक २४ तत्वदिग्दर्शक

(४) पुढील श्लोकप्रस्ताव ५२४–५२८

× गुणत्रयानें सर्व विश्व रंगलेलें

\+ जें ज्ञान भिन्न झाल्यानें त्रिगुणांचा पकडींत विश्व पडलें. त्या ज्ञानासंबंधीं प्रथमवर्णन. कारण शुद्ध ज्ञान झाल्यानें सर्व च शुद्ध व्हावयाचें

श्लो. २० — (१) विभक्तेषु सर्वं भूतेषु येन एकं अव्ययं भावं ईक्षयते ५२९–५३३

× कारण ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता यांचें ऐक्य.

\+ भूतव्यक्ति भिन्न न दिसण्याला

दृष्टांत —

१ सूर्याला अंधार न दिसणें

२ समुद्राला नद्या भिन्न न दिसणें

३ हाताला चित्र न दिसणें

४ जागृतींत स्वप्न न दिसणें

५ सोनें आटून दागिने न दिसणें

६ पाणी गाळून तरंग वेगळे न हाेणें

७ पाण्यानें मीठ भिन्न न उतरणें

कारण २ – ज्ञेय हें ज्ञानाचें स्वरूप

च होतें. दृष्टांत —

आदर्श पाहूं लागल्यास स्वरूपप्रतीति

(२) तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकं ५३७

(३) पुढील श्लोकप्रस्ताव ५३७

---

श्लो. २१ – (१) सबंद श्लोक ५३८–५४७

× राजसज्ञान = भेददर्शन

१ वैचित्र्यदर्शन ५३८–५३९

२ अवस्थाभेददर्शन ५४०–५४१

दृष्टांत – विस्मृति पाहून निद्रा

स्वप्न दाखवितें

३ मूळ अद्वैतांत भेददर्शन ५४२–५४७

× नामरूपाआडचें अद्वैत न दिसणें

दृष्टांत—

१ दागिन्याआड सोनें

२ मडक्याआड माती

३ दिव्यामागें अग्नि

४ वस्त्राआड तंतु

× नामरूपानें द्वैत भासणें दृष्टांत–
१ जळवणांनीं अग्नि भिन्न
२ फुलांनीं गंध ,,
३ तरंगांनीं चंद्र ,,
× भेदज्ञान हें वास्तविक अज्ञान आहे.
हें बाळ ४२, मूढ ४३, मूर्ख ४४,
मुग्ध ४४ इ. भेदज्ञान्यांना परोक्षपणें
दिलेल्या विशेषणावरून व्यक्त होतें
(४) पुढील श्लोकप्रस्ताव ५४८

श्लो. २२ – (१) अहैतुकम ५४९–५६२
× हेतु = कारण. प्रत्येक गोष्ट.
सकारण सांगणाऱ्या श्रुतिस्मृतीची
नीति. विधिनिषेध ५४९–५५१
+ ज्या ज्ञानाला विधिनिषेध नाहींत
दृष्टांत— ५५२–५५७
१ अ सोड गांवांत सोडलेलें कुत्रें
२ सोनें लांबवणारा उंदीर
३ मांसखाऊ मनुष्य
४ रानांतला वणवा
५ शरीरावर बसणारी माशी
६ कावळा
ज्या ज्ञानाला विधिनिषेध नाहींत
प्रत्यक्ष उदाहरणें ५५८–५५९
× 'स्त्री - द्रव्य' मुख्य उपभोग. त्यांत
पेय अपेय, खाद्याखाद्य, निंद्यानिंद्य
कोणता हि विचार नाहीं.

( २ ) यत्तुकृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तम् ५६३–५६५

× कार्ये = देहोपभोगकार्ये

कृत्स्नवत् = सर्व जग माझ्या च उपभोगार्थ

दृष्टांत—

१ मृत्यु सर्व च खातो

२ अग्नि सर्व च जाळतो

× एकस्मिन्कार्ये – एक च कार्य दृष्टांत–

पावसाच्या पाण्याला समुद्र एक च थारा.

या श्लोकावरील विवेचनांत सर्वत्र एका

देहासाठीं उपभोग हा विषय आला आहे.

( ३ ) अतत्त्वार्थवत् ५६६–५७३

× स्वर्ग, नर्क, पाप, पुण्य, देव, उपासना

इ. तत्त्वार्थविचार ज्यांत मुळीं च नाहीं.

केवळ नास्तिकता व देहभोग.

( ४ ) अल्पं च ५७४–५७७

× अल्प = व्यर्थ, क्षुद्र, निष्फळ

– अशा ज्ञानाच्या निष्फळतेला दृष्टांत–

१ धूर आकाशांत निष्फळ

२ भेंडाचें वाढणें ,,

३ उसाचें कणीस ,,

४ षंढ मनुष्य ,,

५ निवडुंगाचें बेट ,,

६ लहान मुलाचें पाहणें ,,

७ चोराच्या घरचें द्रव्य ,,

८ शेळीच्या गळ्याचें स्तन ,,

( ५ ) तत्तामसमुदाहृतम् ५७८–५८१

× तामस ज्ञान हें खरें ज्ञान नव्हे.
ज्ञान नांव केवळ शाद्बिक. दृष्टांत—

१ बहिऱ्याचे कान
२ आंधळयाचे डोळे
३ मद्याचा पान
} हीं नांवें

( ६ ) त्रिविध ज्ञानोपसंहार ५८२

( ७ ) त्रिविध कर्मोपक्रम ५८३–५८५

× कार्याच्या क्रिया त्रिविध ज्ञानाला
अनुसरून चालतात.

---

श्लो. २३ — ( १ ) नियतं ५८६–५८८

× नियत = १ स्वाभाविक दृष्टांत –
पतिव्रतापरिष्वंग

,, = २ भूषणभूत. दृष्टांत –
सावळया अंगाला चंदन
प्रमदालोचनवास अंजन

" + ३ नैमित्तिकाशीं संगत. दृष्टांत—
सोन्यांत सुगंध

( २ ) संगरहितं संग = बोजा ५८९
मनावर यत्किंचित हि बोजा न राहतां
दृष्टांत— आई.

( ३ ) अफलप्रेप्सुना— दृष्टांत— आई ५९०

( ४ ) अरागद्वेषतः कृतम् ५९१

× कर्म पूर्ण झालें किंवा उरलें तरी
त्याचा रागद्वेष नसणें. दृष्टांत—
वाढणारी प्रेमळ— ( माता )

( ५ ) यत्तत्सात्विकमुच्यते ५९२

× या श्लोकांतील सर्व दृष्टांतांत कर्माची
आसक्ति नव्हे पण अत्यंत आस्था
– काळजी – दिग्दर्शित झाली आहे.

(६) पुढील श्लोकप्रस्ताव ५९४

---

श्लो. २४ — (१) यत्तु कामेप्सुना कर्म ५९५–५९८

× आवश्यक नित्यनैमित्तिक कर्म
न करणें व काम्य कर्मे करणें
दृष्टांत—
१ मातापितरांचा अनादर बाहेरच्यांचा आदर
२ तुळशीला पाणी न घालतां द्राक्षीला
दुधाचा पाट

(२) क्रियते बहुलायासं ५९८–६०२

× सर्व काम्य कर्मे सर्व शक्ति खर्च
करून करणें. दृष्टांत —
१ विपुल पिकासाठीं बियांची पेरणी
२ परीस हातीं आला असतां कोळशाची
खरेदी

(३) साहंकारेण वा पुनः ६०३–६०५

× १ आपल्या कर्माची दवंडी
२ कर्तेपणाच्या अभिमानानें वडील
जनांचा, मान्यांचा अनादर. दृष्टांत–
काळतापकरी औषधाला मानीत नाहीं

(४) क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम्
६०६–६१०

× बहुलायास उपमा–
१ डोंबाऱ्याचा दोरीवरचा खेळ
२ धान्यकणासाठीं उंदरानें डोंगर पोखरणें

३ गारुड्यानें सर्पाला डोक्यावर घेणें

४ धान्यकणासाठीं पाताळापर्यंत बोळंबा पोखरतो

× पुन्हां ' क्रियते बहुलायासं ' सांगण्याचें कारण प्रथम बहुलफलाबरोबर बहुल आयास सांगितला. येथें केवळ आणि तो हि निष्फळ कर्मा- बरोबर बहुलआयास.

---

श्लो. २५ — (१) तामसकर्मनिंदा ६११

(२) अनुबंधं ६१२–६१५

× अनुबंध = निष्पत्ति

निष्पत्तिशून्य कर्माला दृष्टांत—

१ पाण्यावरील रेघ

२ पेज घुसळणें

३ राखुंडी फुंकरणें

४ वाळू घाण्यांत गाळणें

५ भूस पाखडणें

६ पोकळीला भोसकणें

७ वाऱ्याला पकडण्याला फास टाकणें

(३) क्षयं हिंसां ६१६–६२०

× अथवा ज्या कर्मानें स्वतःचा क्षय व जगाची हिंसा. दृष्टांत—

१ कमळावरील काटेरी फास ओढल्यानें कांटे झिजणें व कमळ चिरणें

२ पतंगाच्या झडपीनें पतंग मरतो व दिवा विजतो.

३ माशी स्वतः मरून दुसऱ्याला
ओकावयास लावते.

( ४ ) अनपेक्ष्य च पौरुषं ६२१-६२३

× आपल्या सामर्थ्याचा आवाका
लक्ष्यांत न घेतां कर्माचरण.

( ५ ) मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ६२४-६२६

× मोह = अविवेक
अविवेक दृष्टांत–
१ अग्नि घर जाळतो
२ समुद्र खवळून मर्यादा सोडतो.

( ६ ) त्रिविधकर्मोपसंहार ६२७-६२८

( ७ ) त्रिविध कर्त्यांचा उपक्रम ६२९-६३०

× कर्माच्या त्रिविधपणाला अनुसरून कर्ते त्रिधा.

---

श्लो. २६ – ( १ ) मुक्तसंगः ६३१-६३३

× संग = फलासक्ति
+ फलासक्तिरहितत्व म्हणजे
निष्फलत्व नव्हें. तर परमसफलत्व.
हें दाखविण्यासाठीं दृष्टांत —
१ चंदन, २ नागवेल

( २ ) अनहंवादी ६३४-६३५

× आदरानें कर्म करून हि
ईश्वरार्थ अपार कर्म करून हि
अहंकार नाहीं. दृष्टांत– वर्षाव.

( ३ ) धृत्युत्साहसमन्वितः ६३६-६४४

धृति = कर्मार्थ निरनिराळे निर्बंध
सहन करण्यासाठीं लागणारी शक्ति ६३८

निरनिराळे निबंध —
योग्य वेळ, योग्य स्थळ, शास्त्राचा क्रिया
निर्णय ६३६
चित्तैकाग्र्य, फलाशात्याग, नियम ६३७
उत्साह:—
१ आत्म्यासाठीं कर्म करण्यांत आवड
२ देहसुखत्याग
३ आळस, निद्रा, भूक इ. घ्या आहारीं न जाणें
४ विषयेच्छात्याग
५ देहाभिमाननाश

( ४ ) सिध्दसिध्दोर्निर्विकार: ६४५–६४७
× कर्म अर्धवट राहिलें तरी दुःखी न होणें दृष्टांत— कड्यावरून पडलेला गाडा.
× कर्म सिद्धीस गेलें तरी तें न मिरवणें

( ५ ) कर्ता सात्विक उच्चते ६४८

श्लो. २७ — ( १ ) रागी ६४९–६५१
× सर्व वासनांनीं भरलेला तो रागी. दृष्टांत—
१ गांवची घाणेरडी जागा
२ मसणवटी

( २ ) कर्मफलप्रेप्सुः ६५२
( ३ ) लुब्धः ६५३–६५४

× कर्मफळासाठीं कांहीं न सोडतां
प्राणार्पणतयारी.
स्वतः कद्रूपणा करून दुसऱ्याच्या
वस्तु हरण करण्याची बुद्धि
दृष्टांत – बगळा

( ४ ) हिंसात्मकः ६५५–६५७

× स्वतःच्या स्वार्थासाठीं दुसऱ्याला
त्रास देणें. दृष्टांत – बोर

( ५ ) अशुचिः ६५८

× दृष्टांत – धोत्र्याचें फळ

( ६ ) हर्षशोकान्वितः ६५९–६६०

× हर्ष = कर्मसिद्धीनें जगाला
हिणवणें
शोक = कर्माच्या असिद्धीनें जगाला
शिव्या देणें.

( ७ ) कर्ता राजसः परिकीर्तितः ६६१

( ८ ) पुढील श्लोकप्रस्ताव ६६२

× दुष्कर्ममळा = तामस कर्ता

---

श्लो. २८ — ( १ ) अयुक्तः ६६३–६६९

× १ दुष्कर्मसहजता. दृष्टांत—
अग्नि, शस्त्र, काळकूट
२ आपल्या कर्माचा परिणाम न पाहणें
दृष्टांत – वादळ
३ करणी व हेतु यांचा मेळ नसणें
दृष्टांत – वेडा
४ सतत इंद्रियविषयभोग. दृष्टांत – गोचिड.
५ स्वैरपणा – दृष्टांत – अजाण मूल.

( २ ) प्राकृतः ६७०

× प्रकृतीच्या अधीनपणामुळें
कृत्याकृत्यभाव नसणें.

( ३ ) स्तब्धः ६७०–६७१

× खोट्या प्राप्तीनें फुगणें दृष्टांत—
उकिरडा.

+ कोणाला हि, ईश्वराला हि मान
न देणें. दृष्टांत– डोंगर.

( ४ ) शठः ६७२

× चौर्य व विषयव्यापारवृत्ति म्ह.
शठत्व. दृष्टांत – चोर, वेश्या

( ५ ) नैष्कृतिक ६७३--६८०

× = १ कापट्य. दृष्टांत – जुगारी अड्डा
= २ क्रूर अभिलाषा. दृष्टांत–
मिल्लांचा गांव
३ दुसऱ्याच्या सत्कृतीनें चिडून
तिचा विचका करण्याची वृत्ति
दृष्टांत—
१ दुधांत पीठ
२ थंड पदार्थ उष्ण
३ चांगलें अन्न – शरीरमळ
४ सर्प – विष

( ६ ) अलसः ६८१–६८३

× सत्कर्म परमार्थांत आळस. दुष्कर्म
स्वार्थांत तत्परता. दृष्टांत—

१ द्राक्ष व अंब्याच्या मोसमांत
  कावळ्यांच्या तोंडाला रोग येणें.
२ दिवसा घुबड आंधळें

( ७ ) विषादि — ६८४–६८५

× परोत्कर्षविषाद = मत्सर
नेहमीं आंत विषाद असण्याला
दृष्टांत—
१ समुद्रांत वडवानळ
२ वेंडांच्या विस्तवांत धूर इ.

( ८ ) दीर्घसूत्री च — ६८६–६८७

× १ अतिदीर्घकाळपर्यंत लांबणारा कामिक
  व्यापारारंभ
२ सत्कर्म करणें लांबणीवर टाकणें

( ९ ) कर्ता तामस उच्यते — ६८८

(१०) कर्ता कर्म व ज्ञान तिहींचें त्रिधा
कथन म्हणून उपसंहार — ६८९

---

श्लो. २९ — ( १ ) बुद्धीची व्याख्या — ६९०–६९१

× अविद्या, मोह, संशय, आत्मनिश्चय } दिसणारा आरसा

( २ ) जगांत सर्व त्रिविध त्याप्रमाणें
बुद्धि व धृति ( बुद्धेर्भेदं धृतेश्चैव
गुणतः त्रिविधं ) — ६९२–६९४
सर्वत्र त्रिविधत्वाला दृष्टांत—
अग्नि नाहीं असें काष्ठ !

( ३ ) बुद्धिधृतित्रिविधत्वकथनप्रस्ताव

श्लो. उत्तरार्ध ६९५

( ४ ) बुद्धित्रिविधत्वकथनप्रस्ताव ६९६

श्लो. ३० — ( १ ) प्रवृत्ति – कार्यं – मोक्षं या वेत्ति ६९७–७०८

× प्रवृत्ति त्रिविध

१ नित्यनैमित्तिक २ काम्य

३ निषिद्ध

त्रिविध प्रवृत्तींत संसारजन्ममृत्युभय म्हणून नित्यनैमित्तिक कर्म निष्कामत्वानें सेवावें म्हणजे तें अभय व मोक्ष प्राप्त करून देईल. म्हणून ( काम्यनिषिद्ध फळ इ. ) निवृत्तिपूर्वक प्रवृत्ति जाणणें हें सात्विकलक्षण.

— अभयमोक्षदप्रवृत्तीवरील विश्वासाला

दृष्टांत– १ तृषार्त – जीवन

२ पुरांत पडलेल्याला – पोहणें

३ अंधकारांत – सूर्यकिरण

४ पथ्य औषधानें – रोगनिवारण

५ माशाला पाणी आधार

( २ ) निवृत्ति – अकार्यं – बंधं भयं या वेत्ति

७०९–७१५

× काम्य, निषिद्ध, जन्ममरणभयद कर्मापासून जी बुद्धि निवृत्त होणें जाणते ती सात्विक. या जाणण्याला दृष्टांत–

१ आगींत शिरतां येत नाहीं
२ अथांग डोहांत उडी घेतां येत नाही
३ तप्तलोह धरतां ,, ,,
४ काळसर्पस्पर्श करतां ,, ,,
५ वाघाच्या जाळींत पाय टाकतां येत नाहीं.
६ विषमिश्र अन्न खातां ,, ,,

( ३ ) थोडक्यांत श्लोकसार व उपसंहार ७१६–७१७

× या सबंद श्लोकांतील पदांचा परस्परसंबंध जोडण्यांत ज्ञानेश्वरांचें वैशिष्ट्य दिसतें.

---

श्लो. ३१ – ( १ ) यया धर्ममधर्मं च अयथावत्प्रजानाति ७१८–७२०

× धर्माधर्महीनविवेकबुद्धीला दृष्टांत —
१ बगळा – दूधपाणी
२ आंधळा – दिवसरात्र
३ भुंगा – फूल लाकूड

( २ ) कार्यंचाकार्यमेव च अयथावत्प्रजानाति ७२१–७२२

× मोती पाहून न घेणें

+ कार्याकार्यविवेक न केला तर निषिद्ध कर्म दैवयोगानें टळलें तर च टळावयाचें.

( ३ ) बुद्धिः सा पार्थ राजसी थोडक्यांत सर्व श्लोक ७२३

---

श्लो. ३२ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध ७२४–७२६

× अधर्मं धर्ममिति या मन्यते दृष्टांत—
१ चोरांना राजमार्ग – आडमार्ग
२ लोकांचा दिवस – राक्षसांना रात्र

३ देवहीनाला धनठेवा — कोळसा
४ जीवाला आत्मस्वरूप नाहींसें
\+ मन्यते तमसावृताकडे लक्ष देऊन
पाहिले दोन दृष्टांत
( २ ) सर्वार्थान्विपरीतांश्च ७२७–७२८
× अर्थाला — अनर्थ
गुणाला — दोष
वेदांना — अमान्य
( ३ ) बुद्धिःसा पार्थ तामसी ७२९
× काळोख्या रात्रीची उपमा
( ४ ) त्रिधाबुध्युपसंहार ७३०
( ५ ) त्रिधाधृत्युपक्रम ७३१–७३२
× बुद्धीला अनुसरून धृति

---

श्लो. ३३ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध + योगेन ७३३–७४२
× धृतीनें मनप्राणेंद्रियक्रियांचें धारण
होणें म्हणजे मनप्राणेंद्रियांच्या
क्रिया बंद होणें. दृष्टांत— ७३३–७३७
१ सूर्योदयाबरोबर अंधार बंद होणें
२ राजाज्ञेनें अयोग्य व्यवहार ,, ,,
३ वाऱ्याच्या योगानें ढग नष्ट ,,
४ अगस्त्यदर्शनानें समुद्र मूक ,,
५ चंद्रोदयानें कमळें मिटणें
६ मदोन्मत्त हत्तीनें सिंहास हि न भिणें
× मनादींचे व्यापार बंद होऊन
म्हणजे पुढील स्थिति होऊन
मनप्राणेंद्रियें हृदयांत धारण होतात.
७३८–७४२

१ विषय व इंद्रियसंबंध नष्ट
२ इंद्रियांची मनांत लीनता
३ प्राणांची सुषुम्नेंत लीनता
४ मनाला सोडून बुद्धि एकटी च लीन

( २ ) अव्यभिचारिण्या धृतिः ७४१

× परमेश्वराशीं अव्यभिचारी
परमेश्वर स्वाधीन करीपर्यंत
मनप्राणेंद्रियें ज्या धृतीनें धारण
केलीं जातात.

( ३ ) धृतिः सा पार्थ सात्विकी ७४४

---

श्लो. ३४ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध ७४५-७४६

× राजस धृतीची धर्मार्थकाममूळ
भूमिका

+ त्या मूळ भूमिकेवरून राजस
धृतीचा धर्मार्थ कामव्यापार
जहाजांतील व्यापाराचें रूपक

( २ ) प्रसंगेन फलाकांक्षी ७४७

× मूळ कर्मापेक्षां चौपट फलाकांक्षा

( ३ ) धृतिः सा पार्थ राजसी ७४८

( ४ ) पुढील श्लो. प्रस्ताव ७४८

---

श्लो. ३५ — ( १ ) तमोगुण शब्दावर टीका. गुण
नसून ज्यांत सर्व ' दोष ' तो तमोगुण
७४९-७५१

दृष्टांत — ' मंगळ ' ग्रह ' दुर्मेवा '
शब्दाकडे लक्ष देऊन ही टीका असावी.

( २ ) यया स्वप्नं न विमुंचति ७५२-७५३

× आधीं आळस

+ झोंप न सोडण्याला दृष्टांत--

पाप्याला दुःखें जशीं सोडत नाहींत.

( ३ ) यया भयं ७५४

× भयकारण – देहधनप्रेम.

दृष्टांत – शिळेचा कठिणपणा

( ४ ) शोकं. ७५५

× शोककारण – पदार्थमात्राची आसक्ति

दृष्टांत– कृतघ्नाला पाप

( ५ ) विषादं = असंतोष

दृष्टांत – १ लसुणाला दुर्गंधी

२ अपथ्यशीलाला रोग

( ६ ) मदमेव च ७५८–७६०

× मदकारण – तारुण्य, द्रव्य व वासना

दृष्टांत— १ उष्णता विस्तवाला

२ साप दावा

३ भय जगाला

४ काळ शरीराला

( ७ ) श्लो. उत्तरार्ध ७६१–७६२

( ८ ) त्रिविधधृतिकथनोपसंहार ७६३–७६४

× बुद्धि कर्मदर्शक

इंद्रियें कर्मकारक

धृति – या सर्वांमागें आधार

दृष्टांत— सूर्य - मार्गदर्शन

पाय – मार्गचालक

धृति – या सर्वांमागें आधार

आरंभी कष्टाला दृष्टांत—

१ चक्रवाकवियोग

२ गाईजवळून वासरूं नेणें

३ भिकारी अन्नपात्रावरून उठवणें

४ आईचें एकुलतें एक मूल मृत्यूनें नेणें

५ माशाला पाण्यांतून काढणें

( २ ) परिणामेऽमृतोपममम्  ७८८–७९१

दृष्टांत—

१ क्षीरसागरांतून परिणामीं अमृत

२ वैराग्यरुपी हालाहलांतून धैर्यशंभूला परिणामीं ज्ञानामृतलाभ

३ हिरवें द्राक्ष आधीं आंबट परिणामीं गोड

( ३ ) श्लो. उत्तरार्ध  ७९२–७९३

× आत्ममयबुद्धिदृष्टांत – गंगासागरसंगम

---

श्लो. ३८ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध  ७९४–७९८

× दृष्टांत—

१ अधिकारी गांवांत आल्याबरोबर आधीं उत्सव

२ कर्ज काढून लग्न

३ रोग्याला वर्ज्य साखरकेळीं गोड लागतात

४ बचनाग आधीं मधुर

५ ठकाची मैत्री आधीं गोड

६ वेश्येचें वर्तन आधीं मधुर

७ बहुरुप्याचा विनोद आधीं चांगला.

( २ ) श्लो. उत्तरार्ध  ७९८–८०५

× दृष्टांत -- पोसलेला राजहंस खडकावर आपटणें

+ परिणामवर्णन—

१ सुख, प्राण, पुण्यनाश

२ पूर्वीचे सुखभोग स्वप्नवत

३ इहलोकीं आपत्ती परलोकीं दुर्गती

---

श्लो. ३९ — ( १ ) निद्रालस्यप्रमादोत्थं + श्लो. पूर्वार्ध ८०४–८०८

× प्रमाद–

| | |
|---|---|
| निषिद्ध पेयें | इ. मधून |
| ,, अन्न | मिळालेलें सुख |
| ,, स्त्री | |
| परघात | |
| ,, धनापहार | |
| भाटांची स्तुति | |

( २ ) तत्तामससमुदाहृतम् ८०९

( ३ ) त्रिविध सुखोपसंहार ८१०

( ४ ) पुढील श्लोकप्रस्ताव ८११–८१२

× जगांत– १ कर्ता, २ कर्म, ३ कर्मफळ } सर्वव्यापी

+ कर्ताकर्मफळांत त्रिगुण व्यापलेले.

दृष्टांत – वस्त्र – तंतु

---

श्लोक ४० – ( १ ) थोडक्यांत सर्व श्लोक ८१३

( २ ) दृष्टांत प्रश्नरूपानें– ८१४

१ लोकरीशिवाय कांबळें

२ माती ,, ढेंकूळ

३ पाण्या ,, लाट

( ३ ) श्लोकसिद्धांत ८१५–८१६

( ४ ) पुढील श्लोकोपक्रम ८१७

श्लोक ४१ – पूर्वार्ध ८१८–८२३

× चातुर्वर्ण्यरचना स्पष्टीकरण

वेदाधिकारी ( १ वर्णांत मुख्य ब्राह्मण.
( २ क्षत्रिय /
( ३ वैश्य ⅃ — ब्राह्मणाबरोबर
चे कारण वेदाधिकार

वेदाला अन- ( ४ शूद्र– वेदाला अनाधिकारी
धिकारी तिन्ही वर्णाशीं संबंध
तिन्हीं वर्णाबरोबर जीवन
वृत्ति अवलंबित

\+ शूद्रांचा तिन्हीं वर्णाबरोबर नेहमीं
व्यवहार. त्यामुळें शूद्रमान्यता. दृष्टांत–
फुलाबरोबर माळेंतील सूत्र मान्य.

( २ ) श्लो. उत्तरार्ध ८२४–८३०

× त्या त्या वर्णाच्या कर्मांतून च
त्यांची मुक्ति ८२४

\+ तीन गुणांतून चार वर्णांच्या कर्मांची
विभागणी ८२५–८२७

दृष्टांत –
१ बापाचें द्रव्य मुलांत
२ सूर्यप्रकाशानें प्रकाशित
वाटा वाटसरूंत
३ धन्यानें आपलीं कामें नोकरांत
७ तीन गुणानीं विभागणीचें स्पष्टीकरण

८२८–८३०

सत्वाधानें – ब्राह्मण
,, – क्षत्रिय

सत्वमिश्ररजानें — वैश्य
तममिश्ररज — शूद्र

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव ८३१–८३२

× गुणांनीं स्पष्ट होणारें कर्म
शास्त्र दाखवितें. दृष्टांत—
दिवा — आपली वस्तु

---

श्लो. ४२ — ( १ ) शमः ८३३–८३४

× इंद्रियवृत्ति ताब्यांत ठेवून
आत्म्याच्या ठिकाणीं लीनता
म्ह. शम. दृष्टांत — धर्मप्रश्नी

( २ ) दमः ८३५–८३६

× शमांतून ज्याचा आरंभ, शमाला
जो मदतगार आणि शास्त्राज्ञेनें
बाह्येंद्रियें पिटून त्यांना
अधर्माकडे वळूं न देणारा. तो दम

( ३ ) तपस् ८३७

× ज्यामुळें ईश्वराविषयीं एकनिष्ठ
श्रद्धा सतत जागृत राहते तें तप.

( ४ ) शौचं ८३८–८३९

× मनांत भक्ति = शौच
शरीरानें निर्मळ वर्तन

( ५ ) क्षांतिः ८३९–८४१

× सर्व सहन करणें — दृष्टांत — पृथ्वी.
हा पंचमगुण अत्यंत गोड
दृष्टांत सुरांत पंचम

( ६ ) आर्जवमेव च ८४२–८४३

× जीवांची वृत्ति वाकडी असली
तरी सरळपणा राखणें म्ह.
आर्जव दृष्टांत—
१ नदी वक्र — समुद्राकडे जाणें सरळ
( नम्रता, दर्शन + सरळता )
२ पेरापेरांत ऊंस वाकडा तरी
रस गोड
३ दृष्टांतांनीं सरळपणा — नम्रता — गोडी
दर्शविली.

( ७ ) ज्ञानं ८४४–८४६

× सर्व कर्मांनीं ईश्वरप्राप्ति करून
घ्यावयाची हें जाणणें म्ह. ज्ञान
दृष्टांन —
१ माळी मुळाशीं खपतो फळासाठीं

( ८ ) विज्ञान ८४६–८४८

× शास्त्रज्ञान
किंवा ध्यानद्वारा ईश्वराशीं
समरसता = विज्ञान

( ९ ) आस्तिक्य ८४८–८५०

× शास्त्रमान्यत्व = आस्तिक्य
दृष्टांत — नाण्यावर राजाचा ठसा

१० ) ब्रह्मकर्मस्वभावजं ८५१–८५४

× ९ गुणांनीं जें ब्राह्मणाळाभतें तें
स्वाभाविक कर्म.
+ नवगुणलाभ दृष्टांत–
१ नवरत्नहारलाभानें
नवगुणरत्नाकरलाभ

दृष्टांत—

१ पाणी अफाट तरी कमळें त्यावर
फाकून आपली पानें पसरतात.

२ उंची कितो हि असली तरी
त्यावर आकाश उभें राहतें

( ५ ) युद्धेचाप्यपलायनम् ८६४–८६७

× १ आचाट झुंजारपणा।

२ शत्रुला सतत छाती दाखविणें.
दृष्टांत – सूर्यफूल नेहमी सूर्याभिमुख.

३ शत्रुला पाठ न दाखविणे
दृष्टांत – विटाळशी शय्येला पाठ
लावीत नाहीं.

४ क्षात्रियगुणांत हा गुण सर्वश्रेष्ठ
दृष्टांत – १ जशी ४ पुरुषार्थांहून भक्ति

( ६ ) दानं ८६८–८७०

× घेणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें विपुल
देणे म्ह. दान. दृष्टांत—

| | | |
|---|---|---|
| १ वृक्ष – फळेंफुलें | } | इच्छेप्रमाणें |
| २ पद्मवन – सुगंध | | |
| ३ चंद्राचें – चांदणें | | |

( ७ ) ईश्वरभावश्च ८७१–८७२

× १ आपली आज्ञा सर्वत्र चालूं करणें

२ प्रजापालन— दृष्टांत—
अवयव धड करणें.

३ ईश्वरभाव – सर्वसामर्थ्यसम्राट

( ८ ) क्षात्रं कर्म स्वभावजम्. ८७३–८७८

× क्षत्रियाच्या या स्वाभाविक ७ गुणांच्या

× स्वकर्म कसोटी—

१ उचितता – शोभादायकता

म्ह० स्वाभाविकता

दृष्टांत—

१ शब्दादि गुण त्या त्या

इंद्रियांना स्वाभाविक

२ पावसाच्या पाण्याला नदी स्वाभाविक

३ नदीला समुद्र स्वाभाविक

४ गोऱ्या अंगाला गोरेपणा.

स्वकर्मकसोटी – स्वाभाविकतेबरोबर

२ शास्त्राज्ञेनुसार

दृष्टांत—

१ स्वरत्न – रत्नपारख्याकडून पारखवणें

२ स्वदृष्टि– दिव्यानें उपयुक्त

३ स्वतःच्या पायासाठीं– मार्ग पाहिजे

( २ ) अभिरतः ८९२–८९५

× अभिरत= स्वभाव + शास्त्रदोहोनुसार

तल्लीनतेनें स्वकर्माचरण करणें.

म्हणजे १ आळस सोडून

२ फळेच्छा सोडून

३ झटून एकरस होऊन

दृष्टांत — ओघांतील पाणी

( ३ ) संसिद्धिं लभते नरः ८९६–९०५

× कारणें – १ निषिद्ध कर्माशीं संबंध न

येण्यानें संसारापायमुक्तता

२ काम्य कर्मांकडे न पहाण्यानें
(स्वर्गपाशमुक्तता) दृष्टांत –
चंदनाचा खोडा
३ नित्यकर्मांतील फळ ईश्वरार्पण
करण्यानें मोक्षाची ओल लाभणें.
४ वैराग्यलाभ
वैराग्यगौरवः– १००–१०५
सर्वभाग्यसीमा
मोक्षलाभनिश्चिती
कर्ममार्गशेवट = वैराग्य
मोक्षफळाची हमी
पुण्यकर्मवृक्षफळ
आत्मसूर्योदयकथकअरुण
आत्मज्ञाननिधानदर्शक अंजन

(४) श्लो. उत्तरार्ध म्हणजे च पुढील श्लोकप्रस्ताव } १०६–११३

× स्वकर्मनिरतत्वानें कर्म हा च आसरा व ईशसेवा } १०६–१०८

दृष्टांत -- १ पतिव्रता -- पति
२ बालक – माता

+ स्वकर्मनिरतत्वानें ईश्वराची आपोआप
मदत. म्ह. ईश्वरलाभ दृष्टांत– १०९–११३
१ गंगेतील माशाला समुद्रलाभ
कारण १– स्वकर्मनिरताचें ओझें ईश्वरावर
कारण २– स्वकर्म ईश्वराला इष्ट असल्यानें
तो अंकित होतो.

दृष्टांत— १ दासी — मालकीण
२ शिर देऊन सेवा
करणारा — स्वामिशिरीं
कारण ३ ईश्वराला स्वकर्मा व्यतिरिक्त
सेवा अनिष्ट.
उपमा — बाजारचा सवदा.

---

श्लो. ४६ — ( १ ) विहितकर्मगौरव ९१४
( २ ) श्लो. पूर्वार्ध ९१४–९१६
× भूतें — सृष्टि
+ प्रवृत्ति = १ आकारास येणें
२ जीवसृष्टि.
आकारास येणें.
ततम् = ताणून नाचवणें
= व्याप्त. दृष्टांत —
दिव्याची ज्योत प्रकाशानें व्याप्त
( ३ ) स्वकर्मणातमभ्यर्च्य ९१७
× पूजा असल्यानें स्वकर्में फुलें ठरतात.
( ४ ) सिद्धिं विंदति मानवः ९१८–९२१
× विंदति = परमेश्वर देतो.
परमेश्वराकडून भक्ताला प्राप्ति
सिद्धि = वैराग्य
वैराग्यावस्थावर्णन—
१ विश्वाची नावड दृष्टांत — वांती
२ सुखजात दुःखमय वाटणें
दृष्टांत — विरहिणी

२ ईश्वराच्या ध्यानानेंच
त्याच्याशीं तन्मयता

(५) पुढील श्लोकप्रस्ताव ९२२

मुमुक्षूला स्वधर्म अनुष्ठेय. स्वकर्मा-
ऐवजीं पुढील श्लोकासाठीं स्वधर्म
शब्द वापरला.

---

श्लोक ४७ – (१) श्लो. पूर्वार्ध ९२३–९३०

× श्रेयान् स्वधर्मः ९२३–९२५

कारण १– स्वधर्म कठिण
तरी परिणामीं हितकर

दृष्टांत—

१ कडू निंब परिणामीं हितकर

२ केळ प्रसविण्यापूर्वी
निष्फळ तरी परिणामीं सफळ

+ परधर्मात स्वनुष्ठितात् ९२६–९३०

कारण २ – परधर्म चांगला असला
तरी उपयुक्त नाहीं

दृष्टांत —

१ आपली कुरूप आई उपयोगी
रंभा निरुपयोगी

२ पाण्यापेक्षां तूप चांगलें
पण माशाला पाणी च उपयुक्त

३ विषांतील किड्यांना
विष हें अमृत गूळ विष.

(२) श्लो. उत्तरार्ध ९३१–९३३

× किल्बिष = संसार कर्मबंध

+ स्वभावानियत कर्म – दृष्टांत–
पायानें चालणें

V स्वधर्माचरण कठिण तरी तेंच
करण्याचें स्पष्ट कारण– संसारबंध
मुक्ति.

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव ९३४–९३५

× स्वधर्मपालनाचें आणखी कारण
मोक्ष मिळेपर्यंत कर्म बंद राहणें
शक्य नाहीं. कर्मात श्रम आला च.

---

श्लो. ४८— ( १ ) १ श्लो. उत्तरार्ध ९३६–९४८

× दोष = श्रम, काठिण्य

V मुळांतला धूमाग्नि दृष्टांत गाळला.

+ सर्व कर्मात श्रम असल्यानें स्वधर्म
कर्मात ते आहेत ह्या स्वधर्म कर्म दोष
नव्हे ९३६

* सर्वच कर्मात काठिण्य आहे मग
श्रेयस्कर स्वधर्म कर्में च कां करूं
नयेत ? ( असा प्रश्न टाकून १ श्लो.
पूर्वार्धाची भूमिका तयार केली )
दृष्टांत–

१ सरळ वाट – आडवाट

२ धोंड्याचें ओझें – शिदोरी

३ कण कांडणें – भूस कांडणें

४ हविष्यान्न शिजवणें
— कुत्र्याचें मांस शिजवणें
५ दही घुसळणें — पाणी घुसळणें.
६ तीळ गाळणें — रेती गाळणें
७ वैश्वदेवार्थ विस्तव फुंकणें
— घराला आग लावण्यासाठीं
८ धर्मपत्नि सांभाळणें — खर्च
— वेश्यासांभाळ — खर्च.
९ शत्रूसमोर मरणें—
पळतांना मरणें
१० कुलस्त्रीला स्वगृही मार
— परगृही मार
११ अमृतासाठीं कष्ट
विषासाठीं कष्ट

( २ ) श्लो. पूर्वार्ध ९४९–९५१

× स्वधर्म न त्यागण्याला
स्वधर्माचरण विहित कारण
कारण १ —
अंती सर्व कष्ट नाश व मोक्ष
कारण २ —
स्वधर्माचरण हें साधन
दृष्टांत —
१ सिद्धमंत्र
२ नौका — समुद्रांत
३ दिव्यौषधि — महारोगांत

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव ९५२–९५५

× स्वधर्माचरणानें रजतमनाश,
सत्वप्राप्ति व वैराग्यप्राप्ति.

V ( हा विवेचनभाग श्लो. १८।४५
मध्यें आलेला )

+ अशा विरागी पुरुषाचें पुढील
श्लोकांत कथन

---

श्लो. ४९— ( १ ) असक्तबुद्धिः सर्वत्र ९५६–९६०

× देह संसार, पुत्र, स्त्री, वित्त इ.
कोणत्या हि विषयांत न अटकणें
दृष्टांत —

१ वारा – जाळ्यांत सांपडत नाहीं.
२ पक्कें फळ – देठाला रहात नाहीं.
३ विषपात्रसेवन कोणी करीत नाहीं.

+ विरक्तावस्थेंत मन हृदयांतील
एकांत स्थळीं परततें व बाहेर जरी तें
फिरलें तरी त्याचें वैराग्य नष्ट
होत नाहीं
( सर्वत्र – आंत बाहेर वैराग्य )

( २ ) जितात्मा विगतस्पृहः ९६१–९६३

× ऐक्यभावनेनें आत्म्यांत चित्त गोंवणें
म्ह. जितात्मता

+ जितात्मतेनें इहपरविषयवासना
( स्पृहा ) सहज नष्ट होतें

( ३ ) श्लो. उत्तरार्ध ९६४–९८३

× वैराग्यानंतर ज्ञान ९६४

L ज्ञानप्राप्तीचा क्रम— १ कर्मसाम्यदशा
२ सद्गुरुकृपा
३ कर्मत्रिपुटीचा नाश
( संन्यास )

+ कर्मसाम्यदशा ९६५–९६६

संचित भोगन ष्ट – नवीन कर्म नाहीं.

V सद्गुरुलाभ, त्यामुळें ज्ञानदर्शन

कर्मसमाप्ति व पूर्णताप्राप्ति

दृष्टांत— १ रात्र सरून सूर्योदय
( ज्ञानदर्शन )
२ डोंगर देऊन केळीची वाढ
खुंटणें ( कर्म समाप्ति )
३ पौर्णिमा ( पूर्णताप्राप्ति )

H पूर्णता प्राप्तीचें स्पष्टीकरण

( संन्यास ) कर्म कर्ता त्रिपुटीचा विनाश

दृष्टांत — ९७०–९७२

१ सूर्योदय

२ गाभण जनावर मारणें

☐ नैष्कर्म्यसिद्धिं परमां अधिगच्छति ९७३--९८३

X कर्मत्रिपुटीनाशानंतर

ज्ञाता – ज्ञेय – ज्ञान त्रिपुटीचा नाश

V क्रम – प्रथम –

ज्ञेयस्वरुपता दृष्टांत

१ जागृति – स्वप्नांतलें बुडणें

V नंतर —

ज्ञेयस्वरुपतेनें ज्ञानस्वरूपता

दृष्टांत – आरसा

V नंतर – केवळ चैतन्य
स्वरुपता दृष्टांत – तरंग समुद्रलीन

T हीच नैष्कर्म्य स्थिति
हीच सर्व श्रेष्ठ ,,
दोहोंना दृष्टांत –
१ देवळाचा कळस
२ नदीचें समुद्रमीलन
३ सोन्याचा सोळावा कस

L सर्वश्रेष्ठ अवस्थेमुळें
' परम सिद्धि ' नांव

---

श्लो. ५० — ( १ ) यथा सिद्धिं प्राप्तः ९८४-९९०

× सिद्धि = आत्मसिद्धि.

V गुरुकृपेनें आत्मसिद्धि प्राप्त झाल्यावर
कांहीं च कर्तव्य उरत नाहीं.
दृष्टांत—
१ सूर्योदय – अंधारनष्टता
२ दीपस्पर्श – कापूर दीपरूप
३ उदकस्पर्श – मीठ उदकरूप
४ जागृति – निद्रास्वप्ननाश

\+ गुरुकृपेनें द्वैतनाश झाल्यावर कर्तव्य
न उरण्याचें कारण दृष्टांतानें आकाश

( २ ) शिल्लक सर्व श्लोकभाव ९९१-१००७

× गुरुकृपापात्रता. प्राप्त होऊन गुरुकृपालाभ
झाला तरी हि तावडतोब आत्मसिद्धिलाभ
कित्येकांना होत नाहीं. म्हणुन ब्रह्मप्राप्ति
कशी तें सांगावयाचें राहतें.

गुरुकृपापात्रता ९९०-९९७

विहितकर्माचरण
काम्यनिषिद्धत्याग
रजतमनाश
पुत्रद्रव्यस्वर्गादींची अनासक्ति
इंद्रियनिग्रह
स्वधर्मफळ ईश्वरार्पण
वैराग्य

सद्गुरुची गाठ.

V गुरुकृपा होऊन हि ब्रह्मप्राप्ति न होण्याचें कारण गुरुकृपा आणि ब्रह्मप्राप्तिमध्यें कांहीं काळ जावा लागतो. दृष्टांत ९९८-१०००

१ औषध घेतल्याबरोबर रोग जात नाहीं
२ दिवस उगवल्याबरोबर मध्याह्न येत नाहीं
३ रस्ता, सोबत ठीक. पण मुक्काम येण्याला काळ लागतो.

O ब्रह्मप्राप्तिक्रम विस्तृत १००१-१००६

वैराग्यलाभ
सद्गुरुलाभ
ब्रह्मनिश्चय
ज्ञानादित्रिपुटिनष्टता.
ज्ञाननष्टता
आनंदलीनता
शून्यस्वरूपता

+ ब्रह्मप्राप्तिक्रम संक्षेपानें १००६-१००८

वैराग्य
विवेक
क्रमानें आत्मस्वरूप

दृष्टांत– भुकेलेला व षड्रस

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव १००७–१००८

पुन्हां ब्रह्मप्राप्तिक्रम पुढील श्लोकांत

---

श्लो. ५१– ( १ ) बुध्या विशुद्धया युक्तः १०११–१०१२

× बुद्धिविशुद्धतास्थल – गुरूपदिष्ट विवेकतीर्थ

\+ निर्मळ बुद्धि म्ह. स्वस्वरूपस्थ

बुद्धि. दृष्टांत —

राहुमुक्त चंद्र.

( २ ) धृत्यात्मानं नियम्य च १०१३

× धृत्या = सुखदुःख सोडून

आत्मानं नियम्य = आत्मस्वरूपांत लीनता.

दोहोंना दृष्टांत

दोन्ही कुळें त्यागून पतिमग्न स्त्री.

( ३ ) शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा १०१४–१०१८

× विषयत्यागपध्दति—

१ इंद्रियें आवरून विषयत्याग

दृष्टांत – १ सूर्यकिरण आवरून मृगजळलोप.

२ पूर्वींचा सेवन केलेला विषय व विषयवासनात्याग

दृष्टांत – नीचान्न ओकणें.

३ इंद्रियें अंतर्मुख करून त्यांना निर्मळ करणें.

४ योगसाधनानें इंद्रियांचा मनाशीं एकजीव करणें

( ४ ) रागद्वेषौ व्युदस्य च १०१९–१०२१
( ५ ) पुढील श्लोकप्रस्ताव १०२१

श्लो. ५२ – ( १ ) विविक्तसवी १०२२–१०२३
× एकांत
बाह्य { लोकांची गजबज नसलेलें स्थळ
अरण्य केवळ स्वावयवसंगत
मौन
शमदम
गुरुवाक्यचिंतन
काळाचें भान नसणें
( २ ) लघ्वाशी १०२४–१०२६
× १ वर्ज आहारोद्देश – पुष्टि क्षुधाशमन स्वाद.
२ खरा ,, – प्राणधारण
३ मोजक्या आहारानें अपार संतोष.
( ३ ) यतवाक्कायमानसः १०२७–१०३१
× १ झोंप आळस यांना थोडा हि थारा न देणें
दृष्टांत— पतिव्रता परपुरुषनजर
V झोपेला अपवाद – जमीनीला आंग
फक्त दंडवतप्रसंगीं च
१ देहव्यापार चालवण्यापुरते च हातपाय
हालवणें.
३ अंतर्बाह्य शरीर ताब्यांत ठेवणें.
४ अंतःकरणवृत्ति मनाला ओलांडून
बाहेर न जाणें – वाणीचा प्रश्न च नाहीं
( ४ ) ध्यानयोगपरः १०३०--१०४१
× ध्यान १०३०–१०३४

१ ध्यान - सद्गुरुबोधाचें
२ ध्यान - ध्येय - ध्याता एकरुप
होईपर्यंत ध्यान

\+ योग १०३५-१०४१

१ मूळ, ओढियाणा जालंधर बंधत्रय साधून
सर्व वायूंची एकवटता
२ कुंडलिनी जागृति
३ सर्वचक्रभेद
४ ब्रह्मरंध्रांतील अमृत शरीरांत खेळवणें

( ५ ) वैराग्यं समुपाश्रितः १०४२-१०४५

× वैराग्यकारण - ध्यानयोग आत्मज्ञानांत
स्थिर होण्यासाठीं
दृष्टांत— दृष्टि व दिवा.

( ६ ) पुढील श्लोकप्रस्ताव १०४६-१०४९

१ ब्रह्मभूयाय कल्पते १०४६
२ पुढील श्लोकांतील पूर्वार्धाला उद्देशून
लढवय्याचें रूपक
वैराग्य - कवच
राजयोग - घोडा.
ध्यान तलवार
विवेक - तलवारीची मूठ
३ कंदाईत जय १०४९

---

श्लोक ५३ - ( १ ) अहंकारं विमुच्य १०५०-१०५२

× अहंकार - देहाहंकार

V अहंकारस्वरूप —
मृत्यूनंतर हि सुटत नाहीं.

जन्मांत सुखानें जगूं देत नाहीं।
देहासक्तींत बांधतो।

\+ अहंकाराचा देह हा मुख्य दुर्ग म्हणून
त्यावर प्रहार करून हा जिंकला जातो।

( २ ) बलं १०५२

( ३ ) दर्पं १०५३–१०५७

× दर्प – विषय = | गोड विषयावरण
दोष | घालून हल्ला
विषयपूर

अधम – रूपक
सन्मार्ग – खरी वाट
अधर्म – अरण्य
नरक – वाघ

\+ ध्यानखड्ग दर्पमारक साधन

( ४ ) कामं १०५८–१०५९

× काम – १ क्रोधजन्मभूमि
२ दुर्भर स्वरुप

( ५ ) क्रोधं १०५९–१०६१

× काम नष्ट झाल्यानें क्रोध
नष्टता। दृष्टांत —
मूळ गेलें कीं फांद्या गेल्या

* कामक्रोधांचे एकरूपत्व
।स्थितप्रज्ञ व अध्याय ३
मधील प्रमाणें च येथें उक्त

( ६ ) परिग्रहं १०६२–१०६६

× परिग्रहस्वरूप — जुलमी

दृष्टांत -- सत्ताधारी जुल्म करतो.

२ परिग्रहाचें स्वरूप

१ डोक्यावर बसणे

२ दुर्गुण वाढविणें

३ परिग्रहाची सर्वव्यापकता —

संन्यासी — मठ — शास्त्र शिष्य

इ. रूपानें.

गृही — कुटुंबरूपानें

( ७ ) निर्ममः १०६७–१०७५

१ अमानित्वादि गुणप्राप्ति

२ जागृत्स्वप्नसुषुप्ति यांच्या ठायीं ममता नसणें

३ ऋद्धिसिद्धींची ममता नसणें

४ शत्रुमित्रस्वरूप ममता नसणें

× वरील मुद्दे विजयी वीराच्या रूपकांत —

१ अमानित्वादि ज्ञानगुण — कैवल्यप्रांतीचे राजे

२ शुद्ध सत्वज्ञान — राज्य

३ प्रवृत्ति -- रस्ता

४ प्रस्तुत वीर -- त्यांतून मिरवत जाणारा

५ ब्रह्मबोध -- वेताची छडी

६ विवेक -- छडीनें मायिक पसारा ( गर्दी ) दूर करणारा

८ योगावस्था -- पंचारती ओंवाळणारी

९ रिद्धिसिद्धि — पुष्पवृष्टि करणाऱ्या

१० ब्रह्मैक्य — स्वराज्य

(८) शांतः १०७६–१०८६

× साध्य जवळ आल्यामुळें साधनांची
अशांति दूर करण्याची स्थिति =
शांति

∠ साधनें वीररूपकानें—
वैराग्य – चिलखत
ध्यान – शस्त्र
वृत्ति – हात

+ दृष्टांत –
१ औषध कार्य पुरें करून नष्ट
२ मुक्काम आल्यानें पाय थांबणें
३ नदी समुद्राला मिळाल्यानें वेग मंद
४ पतिप्राप्तिमुळें कामुकस्त्रीचांचल्य मंद
५ प्रसवल्यावर केळीची वाढ खुंटणें
६ गांवांत येऊन वाट संपणें

× ही अवस्था म्हणजे परिपक्व अवस्था होय

९) ब्रह्मभूयाय कल्पते १०८७–१०९०

× ब्रह्मप्राप्तीची पात्रता व प्रत्यक्ष
ब्रह्मप्राप्ति यांत अल्प अंतर
दृष्टांत—
१ चतुर्दशीचंद्र – पौर्णिमाचंद्र
२ सुवर्ण १५ कस – १६ कस
३ नदीचें पाणी – निश्चळ समुद्र
शिरल्यानें चंचळ समुद्र

---

श्लोक ५४ – (१) ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा १०९१–१०९५

× ब्रह्मभूतः = ब्रह्मस्वरूपपात्र.

साधनांची आटापीट संपल्यानंतरची
अवस्था = प्रसन्नावस्था
दृष्टांत—
१ शिजल्यावर उष्णता अन्नांतून जाणें.
२ पावसाळ्यांतील – शरदृतूंत
लगबग सरून नदी शांत होणें.
३ गाणें संपलें – कीं परववाजाची
धडपड संपणें.
( २ ) न शोचती न कांक्षति
× कारण समःसर्वेषु भुतेषु १०९६
( ३ ) समः सर्वेषु भूतेषु १०९७-११०६
× समः सर्वेषु भूतेषु म्हणजे
१ भेदात्मक सृष्टिलोप
दृष्टांत—
१ सूर्योदयाबरोबर नक्षत्रलोप
२ धूळपाटीवर हात पुसल्यानें
अक्षरलोप.
× भेदनष्टतेचा क्रम—
१ जागृति व स्वप्नांतली विपरीत व
असत्य ज्ञानें अव्यक्तांत ( अज्ञानांत )
लीन होणें.
२ अव्यक्त हि ब्रह्मबोधांत लीन होणें.
३ ज्ञाताज्ञेयज्ञानभेदनाशानें
पूर्ण अज्ञाननाश
दृष्टांत – १ भोजन
२ मार्ग चालणें
३ पौर्णिमाचंद्र

( ४ ) मद्भक्तिं लभते पराम् ११०७-११२९

× परा भक्ति- भेद नासून सर्वत्र
ईश्वरदर्शन ११०७-१११ १

दृष्टांत—

१ कल्पांतसमयीं सर्व जलमय

२ घटमठ नासल्यावर केवळ आकाश.

३ काकूड जळल्यावर केवळ अग्नि

४ सोनाराच्या मुशींत अलंकार नासून
केवळ सोनें.

५ जागेपणीं स्वप्न नासून केवळ आपणच
शिल्लक राहणें.

L परा भक्ति म्हणजे चौथी ज्ञानभक्ति
V आर्तादि तिघांहून वेगळी म्हणून
ही चौथी वास्तविक ही भक्ति
म्हणजे ईश्वराची सहजस्थिति ११११-१११३
भक्तीची व्याख्या— १११४-१११७
ईश्वराच्या अज्ञानपणावर प्रकाश
पाहून ईश्वराचें भलतें च स्वरूप
दाखवून सर्वांनी भजनीं लावणें
व ज्याला जशी दर्शनेच्छा तसें च
दाखविणें हें ज्या प्रकाशानें घडतें
ती भक्ति. दृष्टांत—

१ स्वप्न दिसणें न दिसणें याला मूळ
असणेंपण।

L आर्त जिज्ञासु अर्थार्थी तीन्ही भक्ति
परमेश्वराला दृश्य करणारी.
म्हणून अज्ञानाश्रित
यांत दोष भेदभावाचा. दृष्टांत--१११८-११२४

१ आरसा.
२ तिमिररोगी व दोन चंद्र दिसणें.

△ परा भक्ति अभेदभावाची
दृश्य मार्गापलीकडची ११२५-११२९
द्रष्टयाचे द्रष्टेपण मावळणारी
दृष्टांत – १ बिंबप्रतिबिंबऐक्य
२ हीन गेल्यावरचें सोनें
३ कलारहित पूर्णचंद्रमा.

---

श्लो. ५५ = (१) भक्ति ११३०-११३३
× या भक्तीसंबंधीं ७ व्या अध्यायांतील
विवरणाचें स्मरण ११३०-११३१
+ या भक्तीचा कल्पारंभी
उपदेश ११३२
V या भक्तीचीं भिन्न भिन्न नावें ११३३
(२) भक्त्या मामभिजानाति ११३४-११९२
× ईश्वरमय होऊन ईश्वराला जाणणें
+ कर्मयोग्यांना ईश्वराशीं मिळतांना
या भक्तीचें फळ मिळतें = त्यांना
सर्वत्र ईश्वरज्ञान होतें (अद्वैतभक्ति)
T त्या अवस्थेंत सर्व भेद साध्य
साधनभेद हि मावळतो. ११३५-११३७
कारण – सर्व भेद पचाविलेला
असतो. दृष्टांत – चारी भूतें
पचवून एकटें आकाश.
V ह्या अवस्थेंत केवळ

आत्मानंदानुभव ११३७–११४१

दृष्टांत – १ गंगासागरसंगम

२ दोन आरसे समोरासमोर

३ आरसा नसतां हि द्रष्टा

आपल्या ठिकाणीं एकटाच

सुखानुभव

४ जागृतीनंतर स्वप्ननाश होऊन

एकटाच सुखानुभव

× एकरूपतेनें आनंदानुभव कसा

येईल या शंकेला दृष्टांतानें

उत्तर ११४२–११५८

दृष्टांत —

१ शब्दानें च शब्दोच्चार

२ सूर्य सूर्यानेंच दिसतो

३ आकाशाला मेढीचा आधार नसतो

४ राजत्व सोडून राजेपणा उपभोगितां

येत नाहीं.

५ अंधकार सूर्याला पाहूं शकत नाहीं.

६ गुंजांचा दागिना माणकांचा

होऊं शकत नाहीं.

७ तरुण पुरुष तारुण्याला उपभोगितो.

८ तरंग पाण्याला ,,

९ प्रभा सूर्यबिंबांत अभेदत्वानें चमकते

१० आकाशातलें आकाशांत ओतप्रोत

होतें

T. कर्मयोगी कोणती हि क्रिया
न करतां च आनंदोपभोग
घेत असतो ११४९-११५०
दृष्टांत —
१ अलंकार सोन्याचा क्रियारहित-
त्वानें उपभोग घेतो
२ चंदनाच्या ठिकाणीं सुवास
कांहीं न करतां च दरवळून रहातो.
३ चांदणें कांहीं न करतां चंद्रांत
विलसतें

T अद्वैतांत क्रियेला वाव नसला
तरी भक्तीला वाव आहे. ११५१-११५२
दिग्दर्शन ( १ ) स्तुति ११५२-११५४
१ प्राचीन संस्कारानें जें बोलले तें
स्तुति. बोलणारा हि ( अद्वैत-
भावामुळें ) मी च.
२ न बोलणें झालें तरी हि
मुकेपणानें स्तवन च.
३ बोलणें हि मौन. मौनानें हि स्तुति
दिग्दर्शन २ ईश्वरदर्शन ११५५-११६४

१ बुद्धि व दृष्टीनें जें पाहूं जावें
तें आत्मस्वरूप च दाखवितें
दृष्टांत — आरसा
२ ईश्वरस्वरूपत्वानें द्रष्टृस्वरूपलोप
दर्श्याभाव दृष्टांत —

१ स्वप्नस्थ तरुणी
२ दोन लाकडांच्या घर्षणांतला अग्नि.
३ सूर्य – प्रतिबिंब
४ सूर्य व अंधार
३ या अवस्थेंतलें दर्शन व अदर्शन हें च ईश्वरदर्शन
दिग्दर्शन ३ यात्रा ११६४–११७२

× सर्वत्र एक च तत्वामुळें स्तब्धतावस्था = सर्व व्यापार बंद होणें ही च यात्रा.
दृष्टांत —
१ आकाशाला डळमळ नाहीं.
२ कल्पांतीच्या पाण्याला ओघ नाहीं.
३ पाय स्वतःच्या पुढें जाणें शक्य नाहीं.
४ आगीनें अग्नि जाळणें शक्य नाहीं.
५ पाण्यानें स्वतः स्नान करणें

V यात्रा केली तरी ईश्वरांतच ती होते. दृष्टांत—
१ पाण्याचा तरंग
दिग्दर्शन ४ पूजा ११७३–११७९

---

× शरीरधर्मामुळें कांहीं कर्म भक्तानें केल्यास त्याला ईश्वर-काम च होतो. तेथें कर्म कर्ता ही भाषा लोपते.
दृष्टांत——

१ आरशानें आरसा पाहणें
२ सोन्यावर सोन्याचा मुलामा
३ दिव्यानें दिव्याला उजेड

\+ कर्म ईश्वर कर्ता ईश्वर तें कर्म
च नव्हे.

८ कर्मजात ईश्वररूप झाल्यामुळें
कांहीं न करणें हें च शिल्लक
उरतें, म्हणजे कर्म करून हि
न करणें च उरतें. ही च
ईश्वराची महापूजा.

= थोडक्यांत सर्व दिग्दर्शन ११८०—११८१
भक्त —
बोलेल ते स्तोत्र
पाहील ते दर्शन
चालेल ती यात्रा
करील ती पूजा
चिंतील तो जप
स्वस्थता ती समाधि

⊙ आत्मा त्वं गिरिजा मतिः — शंकराचार्य
( तात्पर्य भक्तांची क्रिया
ही क्रिया च नव्हे. व अक्रियता ही हि
अक्रियता नव्हे. तर त्याच्या क्रियेंत अक्रियेंत
सर्वत्र अद्वैतभक्ति — अद्वैतांतील क्रियेला
भक्ति म्हणावें. द्वैतांतील भक्तीला हि
क्रिया म्हणावें )
( अद्वैतांत भक्ति जशी शक्य दाखविली )
तसें भक्तीनें अद्वैत दाखवितात.

दृष्टांत— ११८२-११९२

११८२-११८५

१ काकणानें – सोन्याचा संगतींत
२ लाटांनीं – पाण्यांत
३ सुवासानें – कापुरांत
४ तेजानें – रत्नांत
५ तंतूनें – पटांत
६ मातीनें – घटांत

V भक्तीनें अद्वैत साधण्याची करणी

११८५-११९२

तीन अवस्था व क्षेत्रक्षेत्रज्ञ उपाधी-
मुळें विश्व भाव किंवा अभाव
रूपानें दृश्य होते. तें सर्व भक्त ईश्वरमय
म्हणजे द्रष्टामय पाहतो. दृष्टांत—

१ सर्पाभास म्हणजे दोर
२ अलंकार ,, सोनें
३ तरंग ,, पाणी
५ जागृति ,, स्वप्नशून्यता
व मी च हा अनुभव

( ३ ) यावान्यश्चास्मि तत्त्वतः ११९३-१२००

X आस्तिनास्तिपक्षीं मिळून एकूण

४६ विशेषणें—

| | |
|---|---|
| १ अज | १ आनंद |
| २ अमर | २ आद्य |
| ३ अक्षय | ३ साकार |
| ४ अक्षर | ४ सत्ता चाळविणारा |

| | | |
|---|---|---|
| ५ अपूर्व | | ५ सत्ता चालविणारा |
| ६ अपार | | ६ आधार |
| ७ अचळ | | ७ आधेय |
| ८ अच्युत | | ८ सत्ताधारी |
| ९ अनंत | | ९ नित्यासिद्ध |
| १० अद्वय | | १० स्वयंभू |
| ११ निराकार | | ११ निरंतर |
| १२ अनादि | | १२ सर्वरूप |
| १३ अविनाशी | | १३ सर्वांतर्यामी |
| १४ निर्भय | | १४ नवा |
| १५ सर्वापलीकडचा | | १५ जुना |
| १६ कर्महीन | | १६ शून्य |
| १७ द्वैतहीन | | १७ संपूर्ण |
| १८ संगहीन | | १८ लहान |
| १९ शोकहीन | | १९ मोठा |
| २० शब्द | | २० व्यापला जाणारा |
| २१ कान | नसणारा | २१ व्यापणारा |
| २२ रूप | | २२ स्वयंसिद्ध |
| २३ गोत्र | | २३ परब्रह्म |

( ४ ) ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा १२०१-१२०५

× ईश्वराचा स्वसंवेद्यत्वानुभव

म्ह० तत्त्वतां ईश्वर जाणणें

दृष्टांत–

१ स्वप्नभास जाऊन एकटेपणा

२ सूर्य प्रकट करणारा व होणारा एकटाच

\+ द्वैताद्वैतापलीकडचा अनुभव

( ५ ) विशते तदनंतरम् १२०५-१२२२

× तदनंतर म्हणजे ' मी तो आहे '

हें हि भान स्वानंदानुभवांत
लोपल्यानंतर.

\+ ' मी तो ' हें भान नाहींसे होण्याला
दृष्टांत— १२०६–१२१२

१ जागेपणीं स्वतःच्या एकत्वाचें
भान लुप्त

२ सोन्याच्या ठिकाणीं अलंकारा-
बरोबर सुवर्णत्व हि लोपणें.

३ जलस्वरूप मिठाची क्षारता हि
नष्ट होणें

४ कापूर जळून गेल्यावर अग्नि
व कापूर जाऊन केवळ आकाश

५ एकांतून एक वजा केला कीं
बाकी शून्य

६ आहे–नाहीं. भाव–अभावाची
वजाबाकी.

T या अवस्थेंत ईश्वराला कोणती हि
संज्ञा करतां येत नाहीं. १२१३

⊙ या स्वसंवेद्य ईश्वरप्रवेशानुभवाचें
वर्णन १२१४–१२१७

१ बोलणें – न बोलणें न बोलतां वर्णन
२ ज्ञान – ज्ञानाज्ञान जाणीव नसून ज्ञान
३ बोध – बोधानें च बोध
४ आनंद – आनंदानें च आनंदालिंगन
५ सुख – सुखानें च सुखभोग
६ लाभ – लाभाला च लाभ
७ प्रभा – प्रभेला प्रभा जडणें

८ विस्मय – विस्मय विस्मयांत लीन

९ शम – शमाला शम

१० विश्राम – विश्रामाला विश्राम

११ अनुभव – अनुभवाला अनुभवणें

( ६ ) श्लोकोपसंहार कर्मयोगमाहात्म्य १२१८–१२२३

× ईश्वरप्रवेश कर्मयोगामुळें

रूपक १—

कर्मयोग – वेल

ईश्वरप्रवेश – फळ

रूपक २—

कर्मयोग – सम्राट

सम्राटमुकुट – चैतन्यरत्न ईश्वर

ईश्वरमुकुटमणि – कर्मयोगी भक्त

रूपक ३—

कर्मयोग – मंदिर

मोक्ष – कळस

मोक्षकळसावरील आकाशविस्तार—
कर्मयोगीभक्त

रूपक ४—

संसार – अरण्य

कर्मयोग – त्या अरण्यांतील सडक

ईश्वरैक्यगांव – सडकेचा अंत

रूपक ५—

ज्ञानभक्ति – पाणी

कर्मयोग -- प्रवाह

आत्मानंद – समुद्र

( ७ ) कर्मयोगानें ईश्वरप्राप्ति म्हणजे
नवीन वस्तु निर्माण होणें नव्हे.
असलेली स्वतःसिद्ध वस्तु च
कर्मयोगोपायानें सुलभतेनें लब्ध

१२२४–१२२८

× गुरुशिष्यव्यवहार हि ईश्वरमार्ग
जाणण्यापुरता ईश्वर स्वतःसिद्ध च.

+ ईश्वराच्या स्वतःसिद्धतेला
दृष्टांत —
१ पृथ्वींत – संपत्ति
२ काष्टांत – अग्नि
३ गाईच्या कासेंत– दूध

( ८ ) कर्मयोगोपायाप्रस्तावकारण व
गीतागौरव १२२९–१२३५

× प्रस्तावकारण मोक्षोपायसाधनेचा
संपूर्ण विचार व्हावा.

+ इतर शास्त्रांनीं हा विचार कळत
नाहीं. इतर शास्त्रें अज्ञानहारक पण
गीता प्रत्यक्ष बोधदायी.
दृष्टांत —
१ वारा ढग उडवील पण तो सूर्य
निर्माण करूं शकत नाहीं
२ हात शेवाळ बाजूला करतो पण
पाणी निर्माण करूं शकत नाहीं.
सर्व शास्त्रें अध्यात्मकसोटी गीता च
ठरवितात. दृष्टांत—

सूर्य पूर्वेला उगवला कीं सर्व दिशा
उजळतात.

( ९ ) मागें सांगितलेला च ( कर्मयोगोपाय )
पुन्हां कथन करण्याचीं कारणें
१२३६–१२४२

× १ पुन्हां सांगून हा विषय पक्का करावा
२ गीतासमाप्ति जवळ आल्यानें गीता-
रंभाची समाप्तीशीं एकवाक्यता करून
आद्यंत यांत सुसंगति दाखवावी.

( १० ) गीताग्रंथप्रवृत्ति, फळ व उपाय
१२४२–१२४५

प्रवृत्ति — अविद्यानाश ( पुढील श्लोकप्रस्ताव )
फळ — मोक्ष
साधन — ज्ञान

---

श्लोक ५६ — ( १ ) सर्व श्लोक थोडक्यांत १२४६–१२४९

× मद्व्यपाश्रयः = ईश्वराच्या ठिकाणीं
भक्तीनें स्थिर होणें.

∧ कर्माणि कुर्वाणः = स्वकर्मांनीं पूजा करून

※ ईश्वरप्रसाद = अर्चाफळ ज्ञाननिष्ठा
ज्ञाननिष्ठेनें भक्तीचा उत्कर्ष

V अवाप्नोति शाश्वतंपदं = त्या उत्कर्षानें
साम्यशांति व ईश्वरलाभ

( २ ) मद्व्यपाश्रयः . १२५०–१२५१

× कायावाचामनानें आश्रय
दृष्टांत– १ मीठ – पाणी

२ वारा – आकाश.

( ३ ) सर्व कर्माण्यपि सदा कुर्वाणः
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्
१२५२–१२५९

○ ' सर्व ' व ' अपि ' कडे लक्ष देऊन
कचित् अशुभ कर्म घडलें

---

तरी असें घेतलें आहे.

∠ ईश्वरकृपनें शुभाशुभ सर्व कर्मे
नष्ट होऊंन अव्ययपदलाभ दृष्टांत
१ गंगेंत – महानदी व नाला – भेदलोप
२ अग्नींत – चंदन व इतर काष्ठें ,,
३ परिसस्पर्शे ५ कस १५ कस ,,
४ सूर्यप्रदेशीं – रात्र दिवस लोप

---

श्लोक ५७— ( १ ) सर्व कर्माणि मयि संन्यस्य १२६०–१२६१

× नित्यकर्मसंन्यास नाहीं.

( २ ) चेतसा १२६१–१२६५

× चेतसा विवेकानें
विवेकानें = आत्मतत्त्व कर्मापासून
अलिप्त. कर्माचें मूळ
प्रकृति ती हि आत्म्या-
पासून वेगळीं हें जाणून

( ३ ) मत्परःबुद्धियोगमुपाश्रित्य १२६६

× बुद्धि आत्म्याच्या ठिकाणीं रंगली
कीं बुद्धियोग

( ४ ) मच्चित्तः सततं भव १२६७–१२६८

× बुद्धियोगप्राप्तीनंतर चित्त सहज च
ईश्वराला भजतें.

---

श्लोक ५८ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १२६९–१२७३

× पूर्ण ईश्वरचित्तता हा च प्रसाद

T दुर्गाणि – जन्ममृत्यूमुळें उद्भूत दुःखें
म्ह. संसार

V दुर्गाणि तरिष्यसि —
हीं दुःखें दुःखकारक असून हि
सुखकारक होतील कारण
जीवभावलोप

( २ ) श्लो. उत्तरार्ध १२७४–१२७७

× केवल्याहि उच्च अवस्थेला पोंचून हि
अभिमानानें ती अवस्था व्यर्थ होतें

V अभिमानानें देहसंबंध, देहसंबंधांत
पावलोपावलीं आत्मघात.

७ अभिमानानें देहपरता हा मरणापेक्षां
मोठा विनाश.

---

श्लोक ५९ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १२७८–१२८०

× अहंकाराश्रय विवेक सोडून च शक्य

× अहंकाराचा आश्रय म्ह. अहंकार
पोषण दृष्टांत–

१ पथ्य सोडून ताप

२ दिव्याचा द्वेष करून अंधार

V प्रस्तुत अहंकारस्वरूप
मी अर्जुन
हे – स्वजन
युद्ध – पाप

( २ ) श्लो. उत्तरार्ध १२८१-१२८५

× मिथ्या = निष्फळ १२८१
= तथ्यहीन १२८२
= विचित्र | १२८३
= तात्पर्यहीन | १२८४

V प्रकृति – स्वभाव

---

श्लो. ६० – ( १ ) श्लो. पूर्वार्ध १२८६-१२९१

× स्वभावजकर्मनिबद्धतादृष्टांत–
१ पाण्याच्या ओघाउलट पोहणें
२ बीजाची वाढ

+ अर्जुनस्वभावजक्षात्रकर्मनिदर्शन.

( २ ) श्लो. उत्तरार्ध १२९२-१२९६

× मोहात् = अविचारानें

V करिष्यस्यवशोपि तत् दृष्टांत—
१ हातपाय बांधून रथांतून जाणारा मनुष्य.

+ करिष्यस्यवशोऽपि तत्–
अर्जुनचरित्रांतील दाखला–
१ उत्तरगोग्रहणप्रसंग– अर्जुनानें या वेळीं स्त्रीवेश घेऊन हि त्याला प्रकृति स्वभावाप्रमाणें वढावें लागलें

( ३ ) पुढील श्लोकप्रस्ताव १२९७-१२९८

× ईश्वरसत्ताप्राबल्यनिदर्शन दृष्टांत–
रोग
दारिद्र्य

---

श्लो. ६१ — ( १ ) थोडक्यांत सर्व श्लोक रूपकानें } १२९९ –१३०१

१ ईश्वर – सूर्य

२ भूतहृदय आकाश

३ अवस्थात्रय – लोकत्रय

दृश्यवस्तु पाण्याचें सरोवर

विषय – कमळ

पंचज्ञानेंद्रियें व मन हे षट्क

ज्यांना आहे ते जीव – भुंगे

\+ तात्पर्य हृदयांत राहून ईश्वर जीवरूपी भुंग्यांना जगतांत भ्रमवितो.

( २ ) श्लो. पूर्वार्ध १३०२

× हृदेशे तिष्ठति = अहंकाराचा बुरखा घेऊन राहतो.

( ३ ) मायया भ्रामयन् सर्व भूतानि | १३०४–१३०७

× मायया भ्रामयन्–
प्रकृतीच्या पडद्यामागून सूत्रें हालवून

V सर्व भूतानि —
चौऱ्यायशी लक्ष योनींची छायाचित्रें

7 भ्रामयन् चा दुसरा अर्थ
– भ्रम पाडून. प्रत्येक जीवाला आपल्या देहाकृतिच्या ठिकाणीं ‘ मी ’ असा भ्रम.

६. देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि

दृष्टांत--

१ सूत दुसऱ्या सुताशीं गुंतावें

२ गवताची पाती दुसऱ्या पातीशीं गुरफटावी.

३ पाण्यांतलें प्रतिबिंब कहान मुलानें कवटाळावें

( ४ ) यंत्रारूढानि सह सर्व श्लोक १३०८-१३१४

× यंत्र – देहरूपी यंत्र

+ भ्रामयन् – जीवांच्या प्राचीन कर्मांची सूत्रें हालविणें

V भ्रामयन् = भूतांना स्वर्गसंसारांत भ्रमण करण्यास लावणें

दृष्टांत — वारा – गवताची काडी

△ भ्रामयन् = भूतांना चलनवलन करावयास लावणें. दृष्टांत—

चुंबकमणि व लोखंड

+ भ्रामयन् = भूतांना भिन्न प्रकारें नाचविणें. दृष्टांत –

चंद्र – समुद्र

सोमकांत

कुमुद चकोर

* एकूण या श्लोकांत भ्रामयन चे ५ अर्थ केले –

भ्रामयन् १ = सूत्र हलविलें

,, २ = भ्रम पाडणें

,, ३ = भ्रमण करवणे

,, ४ = चलनवलन करवणें

,, ५ = भिन्न प्रकारें नाचविणें

( ५ ) पुढील श्लोकप्रस्ताव १३१४–१३१६

× ईश्वर सर्वभूत हृदयाप्रमाणें अर्जुन
हृदयांत हि असल्यानें सर्व भूतांप्रमाणें च
प्रकृतीची सत्ता तो अर्जुनावर
चालवील च म्हणून
( ईश्वरशरणतास्वीकार – पुढील श्लोकांत )

---

श्लोक ६२ — ( १ ) १ श्लो. पूर्वार्ध १३१७–१३१९

× ईश्वर सर्वाधिकारी. प्रकृतिचालक.
तेव्हां युद्धकर्तव्य वगैरे प्रकृतीवर
सोपवून प्रकृतिस्वामि ईश्वरशरणताकर्तव्य.
दृष्टांत – गंगा – समुद्रप्रवेश

∧ सर्व भावेन—

| अहंस्फूर्ति
| काया
| वाचा
| मनानें

( २ ) श्लो. उत्तरार्ध १३२०–१३२२

× परा शांति = पूर्ण शांति

∨ शांति शब्द स्त्रीलिंगी त्यावरून
प्रमदासंगरूपक

∨ शांतिवर्णन

१. | विश्रांतीची विश्रांति
अनुवाचा अनुभव

२. | स्वात्मपद

---

श्लोक ६३ – ( १ ) इति ज्ञानं १३२३–१३२६

× ज्ञानवर्णन –

नाम – गीता

स्वरूप – सर्व वाङमयसार

फळ – आत्मरत्नलाभ

ख्याति – वेदांतांत

फळ – बुद्धीला प्रेरून ईश्वरदर्शन

( २ ) गुह्याद्गुह्यतरं | १३२६ –

मया आख्यातं | १३३१

× गुह्य असून सांगण्याचें कारण

दयाप्रेम. दृष्टांत–

आईचें मुलाजवळ मोकळें बोलणें.

∠ गुह्यात् गुह्य म्हणजे कथन करण्यास

कठिण दृष्टांत—

१ आकाश गाळून घेणें

२ अमृताची साल सोलणें

३ दिव्याला दिव्य करावयास लावणें

४ सूर्याच्या डोळ्यांत अंजन घालणें.

( ३ ) श्लो. उत्तरार्ध १३३२

( ४ ) अर्जुनमौन – त्याचा श्रीकृष्णकृत

अर्थ= “ अधिक ज्ञानापेक्षा ” या

संबंधीं अंतरंग जाणल्याचें अर्जुनो

त्तर ( पुढील श्लोकप्रस्ताव )

१३३३–१३४०

श्लो. ६४ — ( १ ) श्रुणु मे परमं वचः १३४१

× परमं = निर्दोष

श्रुणु = एकाग्रतेनें ऐक.

( २ ) श्लो. उत्तरार्धभाव १३४२–१३५१

× हें भाषण म्ह. अर्जुनभाग्य ही वस्तु दुर्लभ. पण देवानें अशक्य वस्तु हि शक्य होते.

दृष्टांत—

१ नुसत्या नजरेनें कासवी पिलांचें पोषण करतें.

२ चातकाच्या घरीं आकाश पाणक्या होतें

V हें ज्ञान अद्वैतानें च जाणावयाचें कारण येथे प्रेमविषय आहे. प्रेमाच्या ठिकाणीं दिखाऊ भाग नसणार च.

+ अर्जुन निमित्त. भगवान् वास्तविक स्वतःसाठीं च हे ज्ञान सांगतात दृष्टांत — आरसा आरशासाठीं उटला जात नाहीं. स्वतःसाठीं

☐ अर्जुन भगवंतांमध्यें मुळीं च भेद नाहीं. इतके भगवंताला भक्ताचे वेड. दृष्टांत—

१ पाणी — मीठ

( ३ ) सर्व गुह्यतमं भूयः श्रुणु मे

परमं वचः १३५२

× इतर गूढें या गूढापुढें उघडीं
ठरतात.

---

श्लो. ६५ — ( १ ) मन्मना भव १३५३–१३५५

× मन्मन होणें =
अंतर्बाह्य ईश्वरविषय होणें
दृष्टांत – आकाशांत वायु

× मन व कान ईश्वरमय

( २ ) मद्भक्तः १३५६–१३५७

× ईश्वरभक्त - संतभक्त
कारण संत ईश्वरप्रतिमा
दृष्टांत– कामुक स्त्री

÷ जिभेवर नाम

( ३ ) मद्याजी १३५८–१३५९

× हातापायांचें कार्य
ईश्वरार्थ + परोपकार

= मद्यजन = ईश्वरयजन

( ४ ) मां नमस्कुरु १३६०–१३६१

१ सर्वांना ईश्वर मानणें
२ सर्वसेवाभाव
३ अद्वेष
४ नम्रता

= ईश्वर वंदन

( ५ ) मामेवैष्यासि १३६२–१३६७

× पायरीनें ईश्वरप्राप्ति
ईश्वराला मिळणें.

१ सर्वत्र ईश्वरमय झाल्यानें
देवभक्तएकांत

२ कोणत्याहि अवस्थेंत परस्प-
रांचे भव्यभजकसौख्य
३ शेवटीं देहभाव व देहनाश
झाल्यावर ईश्वरसारूप्य
दृष्टांत —
१ जळनाशानें बिंबप्रतिबिंब एक
२ वायु आकाश | नाशानें
३ तरंग पाणी | एक

( ६ ) प्रतिजाने प्रियोऽसि मे १३६८–१३७३
+ प्रतिज्ञा = शपथ
V अर्जुनाची अर्जुनाला शपथ म्ह.
आत्मस्वरूपाची शपथ
+ शपथ प्रेमामुळें च. नाहीं तर सत्य
संकल्प ईश्वराला तिची जरुर नाहीं.
V प्रेमाला लाज नाहीं.
✱ देष अर्जुनप्रेमामुळें अर्धवट व
अर्जुन पूर्ण

( ७ ) अर्जुनविनय व चतुरता १३७४–१३७८
× अर्जुन केवळ निमित्त भगवंताचे
कार्य जगासाठीं दृष्टांत—
१ कमळ निमित्त सूर्याला जगकार्य
२ चातकाची तहान निमित्त पावसाला
पृथ्वीशांतीकार्य

( ८ ) श्रीकृष्णाकडून प्रस्तुत कोकोपसंहार
१३७९–१३८१

१ प्रस्तुत श्लोकांतील साधनानें
ईश्वरस्वरूपप्राप्ति — दृष्टांत —
मीठ — पाणी
२ साधन — वस्तुमात्रीं आत्मबुद्धि
देहाभिमानलोप

( ९ ) श्रीकृष्णाकडून आतांपर्यंत सांगितलेल्या
कर्मापासून ईश्वरप्राप्तिपर्यंत —
क्रमाचा उपसंहार १३८२–१३८४

क्रम— १ कर्म — ईश्वरार्पण
२ त्यानें चित्तप्रसन्नता
३ प्रसन्नतेनें ज्ञान
४ ज्ञानानें ईश्वरसारूप्य

( १० ) संबंध गीतोपसंहार
प्रस्ताव म्हणजे पुढील श्लोकप्रस्ताव
१३८५–१३८९
१ ईश्वरसारूप्यता झाल्यावर साध्य
साधन व कर्तव्यनाश
२ अर्जुनप्रसन्नताकारण हि
ईश्वरसारूप्य त्यामुळें अर्जुनाचा
युद्धप्रतिबंध ( अज्ञान ) नाश

× गीता अज्ञाननाशिनी व सर्वत्र
ईश्वरदर्शिका

÷ अर्जुनाला अज्ञानत्यागाची आज्ञा
कारण तें धर्माधर्मभ्रांतिकारक

---

श्लो० ६६ — ( १ ) सर्वधर्मान्परित्यज्य १३९०–१३९५

× धर्म = धर्म व अधर्म

∠ धर्माधर्म = स्वर्गनरकदायक

* धर्माधर्ममूळ = अज्ञान दृष्टांत—

१ आशेनें दुःख

२ निंदेनें पातकें

दुर्दैवानें दीनता

= धर्माधर्ममूळ अज्ञान टाकल्यानें

च धर्माधर्म टाकले जातील.

दृष्टांत—

१ दोर हातीं घेतल्यानें सर्पाभासत्याग

२ स्वप्ननाशानें स्वप्नांतिल व्यवहारत्याग

३ कावीळनाशानें चंद्राचा पिवळेपणा

४ दिवसनाशानें मृगजळ

५ लांकूड टाकलें कीं अग्नित्याग

( २ ) मामेकं शरणं व्रज १३९६–१४०५

V अज्ञाननाश झाल्यावर केवळ

परमेश्वर उरतो व त्याच्या

ठिकाणीं जीव तन्मय होतो.

L ईश्वरशरणता = ईश्वराशीं जीवाचें

ऐक्य, दृष्टांत -- घटनाश

= ईश्वराला शरण आल्यावर

जीवपणा उरत नाहीं. दृष्टांत

१ वडवानळ -- समुद्र

२ दासी -- राजवैभव

'Δ ईश्वराळा शरण येणें म्हणजे

ईश्वरमय होऊन सेवा करणें

( ३ ) अहंत्वा सर्वपापेभ्यो

मोक्षयिष्यामि १४०६--१४१५

× ईश्वरशरणतेनंतर धर्माधर्मस्पर्शच

रहात नाहीं. दृष्टांत—

१ लोणी-ताकाला स्पर्श नाहीं
२ परिसस्पर्श झाला कीं लोखंडाचा मळ गेला.
३ लाकडाचा घासून अग्नि प्रगट झाला
कीं लाकूड उरत नाहीं.
४ सूर्यापुढें अंधार नाहीं.
५ जागेपणीं स्वप्नसंभ्रम नाहीं

( ४ ) मा शुचः १४१६-१४१७

× शोक = चिंता

( ५ ) श्रीकृष्णार्जुनैक्य ( आलिंगनरूपानें )

१४१८-१४२५

× ( जणूं काय हा मूर्तिमंत शोक च !
श्रीकृष्णार्जुन आलिंगनरूपानें
अर्जुनशरणता श्रीकृष्णैक्य )

+ शब्द व बुद्धिपलीकडील स्वरूप
अर्जुनाला देण्यासाठीं आलिंगन

V आलिंगनाबरोबर श्रीकृष्णहृदयातील
रहस्य अर्जुनाला प्राप्त व आत्मस्वरूप
लाभ. दृष्टांत—
१ एका दिव्यानें दुसरा दिवा.
= द्वैत न सोडतां आत्मस्वरूपलाभ

+ स्वतः श्रीकृष्ण हि त्या प्रेमसुखाच्या
डोहांत गडप. दृष्टांत—
समुद्राची समुद्राशीं गांठ

∠ तात्पर्य नारायणानें विश्व कोंदलें.

( ६ ) अशी ही श्रीकृष्णकथित गीता वेदमूळ

१४२६-१४४३

× कारण १ --

वेद -- भगवच्छ्वास
व
गीता -- भगवच्छद्व

कारण २ —

गीता — वेदबीज (बीजांत सर्व समावेश)

प्रमाण — कांडत्रयरूपानें गीतेंत वेद

विलसतात. दृष्टांत—

हिरेमाणकांचे दागिनें

( ७ ) कांडत्रयरूपानें गीतेंत कसा त्याचा उलगडा ( अध्यायवार ) | १४३४-१४५६

कर्मकांड अ. १–३ ( १४३५-१४३९ )

---

अध्याय १ — शास्त्रविचाराचा आरंभीचा प्रस्ताव १४३५

,, २ -- सांख्यशास्त्रांतील सिद्धांत मोक्षप्राप्त्यर्थ ज्ञानाखेरीज कशाची हि अपेक्षा नाहीं. १४३५–१४३६

,, ३ -- अज्ञानबद्धासाठीं साधन काम्य निषिद्ध हीं बंधक कर्मे सोडून नित्य नैमित्तिक आचरावीं १४३७–१४३९

देवताकांड अ. ४–११ ( १४४०–१४४५)

अध्याय ४— नित्यनैमित्तिक कर्मबंधकता मुक्ति होण्यास तें ईश्वरार्पण करावें १४४०–१४४३

अध्याय ५ ते ११— हेंच वरील ४ ध्यांतील
तत्त्व १४४४—१४४५

ज्ञानकांड अ. १२—१५ (१४४६—१४४९)

„ १२— अमानित्वादिज्ञानवर्धन १४४७

„ १३ तें १५— ज्ञानपक्कफळनिरूपण
१४४८—१४४९

[ अशी १५ अध्यायापर्यंत कांडत्रयात्मक
गीतापद्यरत्नरवाचित श्रुती च १४५० ]

अध्याय १६ — अज्ञान वैरिसमुदायवर्णन
१४५१—१४५२

„ १७ -- शास्त्रसहायानें वैरिसमुदाय
जिंकावा हें प्रतिपादन १४५३

„ १८ -- सर्व गीतेचा म्ह. १७
अध्यायांचा आढावा
गीताकळश १४५४—१४५५

[ म्हणून गीता मूर्तिमंत 'उदार' वेद च १४५६ ]

[ ८ ] वेदाहून गीता श्रेष्ठ कारण मागील
दोषपरिमार्जनार्थ वेदाचा गीता हा
अवतार. म्हणून गीता सर्व सेव्य
१४५७—१४६६

A मागील दोष-स्त्रीशूद्रादिकांना वेदाचा
अधिकार नाहीं

V गीतेंत अधिकारभेद नाहीं.
सर्वांना कैवल्यलाभावसर उदाहरण—
१ अर्थरूपानें गीता मनन करणारा
२ गीता श्रवण करणारा

३ गीता पठन करणारा
४ गीता लेखन करणारा
सर्वांना सारखें कैवल्य.

दृष्टांत— आकाश सर्वांना सारखें मोकळें
पृथ्वीवर रहाणाऱ्यांना
सूर्य प्रकाशांत वावरणाऱ्यांना
आकाशांत राहणाऱ्यांना

( १० ) गीतेंतील भगवंताचें खरें ज्ञान
स्वरूप व अर्जुनाची ज्ञानपात्रतेनें
व जगावर उपकार केल्यानें धन्यता
१४७१–१४७२

× भगवान् लक्ष्मीपति नव्हेत
सर्व शास्त्ररत्न उजळणारें मुखरूप
आकाशांतील सूर्य

( ११ ) पुढील श्लोकांचा प्रस्ताव } १४७३–
गीताकथनसंप्रदायप्रस्ताव } १४८५

× अर्जुनाला भानावर आणून प्रस्तुत
शास्त्र पटण्यासंबंधीं श्रीकृष्णप्रश्न व
अर्जुनोत्तर

+ ज्ञानलाभ हा अपूर्व च. परंतु त्याच्या
अनुष्ठानकुशलतेखेरीज तो व्यर्थ
दृष्टांत— १४७५–१४८५

१ क्षीरसागरांतुन कष्टानें अमृत
मिळालें पण तें असुरांना मरण
कारण च झालें. ( अनुष्ठानकुशलताभावीं )

२ संपत्तिभोगरीति माहीत नसेल
तर तिचा नाश

३ नहुष स्वर्गाला गेला पण तेथें वर्तावें कसें हें न कळल्यानें पतन.

४ गाय उत्तम पण तिला संध्याकाळीं पिळावी कशी हें माहीत नसल्यास व्यर्थ.

V गुरुप्रसन्नतेनें विद्याप्राप्ति परंतु शास्त्रसंप्रदाय पाळला नाहीं तर व्यर्थ. प्रस्तूत शास्त्रसंप्रदायाचें पुढील श्लोकीं कथन

---

श्लोक ६७ — (१) इदं ते नातपस्काय १४८६

(२) नाभक्ताय कदाचन १४८७-१४८८

× भक्ति = गुरुभक्ति

∠ तपस्वी असून हि गुरुभक्ति नसेल तर गीताज्ञान कथनायोग्य

दृष्टांत—

१ वेद – अंत्यज टाळतात

२ म्हातारा कावळा यज्ञाहुतीला अनधिकारी.

(३) न चाशुश्रूषवे वाच्यं १४८९-१४९६

× तप व गुरुभक्ति असून हि श्रवणेच्छा नसेल तर तो त्या गुणांनीं पूज्य तथापि श्रावणाधिकारी नव्हे.

दृष्टांत—

१ मोतीं चांगलें पण ओंवण्याला भोंक पाहिजे.

२ समुद्र खोलखरा पण त्यांत पडलेला पाऊस व्यर्थ

३ भूक नाहीं त्याला पक्वान्नें निरुपयोगी.

४ डोळा चांगला पण त्याला
वास कळणें शक्य नाहीं.

( ४ ) न च मां योऽभ्यसूयति १४९७–१५०६

× तप, भक्ति, श्रावणेच्छा असून हि
ईश्वर व ईश्वरभक्तांविषयीं ज्यांच्या
मनांत तुच्छभाव असेल तो गीता-
ज्ञान श्रावणाला अनाधिकारी. अशाचे
तपादि गुण व्यर्थ. दृष्टांत—

१ दीपज्योतिहीन समई

२ अंग गोरें, तरुण, अलंकारयुक्त
पण प्राणहीन.

३ सोन्याचें घर पण सर्पिणीनें अनिरुद्ध द्वार.

४ उत्तम पक्वान्न पण काळकूटयुक्त.

५ मैत्री वरून चांगली पण आंत कपट

+ ईश्वरनिंदक प्रत्यक्ष ब्रह्मदेव का असेना
गीता त्याला कौतुकानें हि सांगूं नये.

---

श्लोक ६८ – ( १ ) श्लो. पूर्वार्ध १५०७–१५०९

× भक्त म्हणजे
तप + गुरुभक्ति + श्रवणेच्छा
+ आनिंदावृत्ति [ मागील श्लोकावरून
ही भक्ताची व्याख्या ]
रुपक—

तप – पाया

भक्तमंदिर {
गुरुभक्ति– मंदिर
श्रवणेच्छा– उघडें दार
अनिंदा– रत्नकलश
}

गीता कथन [ गीतारत्नेश्वर प्रतिष्ठापना

( २ ) श्लो. उत्तरार्ध १५१०-१५१३

× गीतावर्णन गौरवानें

१ प्रणवांत अडकेलला ॐ
गीतेच्या फांद्यांत विस्तारला

२ गायत्रीच गीतेच्या श्लोकांत फुलाफळांनीं
अवतरली.

⊙ अशा गीतेशीं भक्ताची गांठ
घालून देण्याला दृष्टांत—
अनन्य बालकाची आईशीं गाठ

V ही गांठ घालून देणारा– ' देहपातानंतर
ईश्वराशीं एकरूप

---

श्लो. ६९ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १५१४-१५२३

× भक्ताचा देह हा व्यर्थ देह नसतो.
म्हणून देहाचें लेणें लेऊन अशी भाषा.
भक्त देह हा अलंकार !

= मनुष्येषु – ज्ञानी, कर्मठ आणि
तपस्वी यांमध्यें

V ईश्वराला अतिप्रिय असा हा भक्त
ईश्वराच्या प्रेमानें च गीता सांगतो.

* तस्मात् – गीता कथन करणाऱ्या
भक्ताहून. कारण त्याचें सांगणें हें रडकें
सांगणें नसतें. रडकां गीता सांगणारा
ईश्वराला प्रिय नाहीं. भक्ताचें
सांगणें हें अत्यंत स्फूर्तियुक्त हें

दर्शविण्यासाठीं रूपक—

भक्तसमूह – बाग

गीतावक्ता -- वसंत

नवपल्लवरोमांच – नवसिद्धांतामुळें रोमांच

मंदवाऱ्यानें – भक्तांना रंगवून टाकणें

डोलणे

फुलांचे डोळे ओले करणें– भक्तांचे डोळे गद्गदतेमुळें भरून येणें

पंचमस्वराच्या हाका – मधुर व्याख्यान

दृष्टांत—

१ चंद्रोदय–चकोर

२ मेघ – मयूर

( २ ) श्लो. उत्तरार्ध १५२२–१५२३

---

श्लोक -- ७० ( १ ) य इमं धर्म्यं संवादमावयोः } १५२४

× धर्म्यं = मोक्षधर्मोत्पादक

( २ ) अध्येष्यते १५२५

× अध्ययन = अक्षराचा हि फरक न करतां पाठ म्हणणें.

( ३ ) श्लो. उत्तरार्ध १५२६–१५२८

× गीतार्थ करणाऱ्याला जें फळ तें पाठकाला हि. कारण गीता माऊली जाणतें नेणतें हा फरक करीत नाहीं.

---

श्लोक ७१ -- ( १ ) श्रद्धावाननसूयश्च १५२९

( २ ) शृणुयादपि-

यो नरः सोऽपि मुक्तः १५३०-१५३३

× शृणुयादपि – श्रवण करतांक्षणीं च

V सोऽपि मुक्तः– पापापासून मुक्त

V श्रवण केल्याबरोबर तत्क्षणीं

पापापासून मुक्त दृष्टांत —

१ वनांत वणवा शिरतां च प्राणि

पळतात.

२ पूर्वगिरीवर सूर्य येतां च अंधार नष्ट

T पापापासून मुक्ति म्हणजे सृष्टीच्या

उत्पत्तीपासूनच्या पापापासून मुक्ति.

( ३ ) प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् शुभाँल्लोकान्

१५३४-१५३७

× श्रवणानें जन्मरूपीवेल शुद्ध होऊन

पुण्यफळ लाभतें.

+ पुण्यफळ —

जितकीं अक्षरें ऐकलीं तितक्या

अश्वमेधाचें.

V इंद्र वैभवलाभ

O ईश्वराला मिळण्यापूर्वी स्वर्गलाभ

हा श्रावकाचा मुक्काम ( वास्तविक

स्वर्गांतून मृत्युलोकीं यावें लागतें.

पण गीताश्रावक हा अपवाद )

( ४ ) गीतापाठक श्रावक फलोपसंहार

व पुढील श्लोकप्रस्ताव १५३८-१५३९

श्लोक ७२ — ( १ ) श्लो. पूर्वार्ध १५४१–१५४३

× एतत् — १ शास्त्रसिद्धांत
२ ज्ञान

V एकाग्रचेतसा – कानीं आलें तसें च
मनांत ठसणें. एकाग्रतेची कसोटी.

( २ ) श्लो. उत्तरार्ध १५४४–१५४५

× अज्ञान = आत्म्याविषयीं अज्ञान.

V ज्ञानाच्या ठिकाणीं कर्माकर्म संभवत
नाहीं या दृष्टीनें ज्ञानकसोटी म्हणून
प्रश्न – कर्माकर्मविषयक

( ३ ) प्रश्न विचारण्यांतला श्रीकृष्णहेतु
१५४६–१५४९

× अर्जुनाची पूर्णब्रह्मस्थिति भगवंतांना
माहीत च. तथापि अर्जुनमुखानें
ती वदवणें हा हेतु.

T या हेतुसाठीं अर्जुनाच्या पूर्ण
ब्रह्मस्थितिचा भंग.

( ४ ) अर्जुनाची या प्रश्नामुळें झालेली
अवस्था १५५०–१५५७

+ ब्रह्मभाव व जगताचें भान दोन्ही
अर्ध्याअवस्थांत सापडलेला
अर्जुन. दृष्टांत—
१ क्षीराब्धीमधून निघत असलेला
पूर्ण चंद्र

+ प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं अर्जुनाची तयारी.
१ देहभानावर येणें

२ केंस व रोमांच कंपीत हातांनीं
ठीक करणें
३ घाम पुसणें
४ डोळ्यांतील आनंदाश्रु आवरणें
५ गहिंवर कंठांत दाटत होता
तो आवरणें
६ बोबडी वाणी नीट करणें
७ दम लागलेला छाटणे

---

श्लोक ७३ — (१) श्लो० पूर्वार्ध १५५८–१५६४

× भगवंतांनींच हा प्रश्न विचारण्याची
अनवश्यकता
कारण— १ प्रत्यक्ष भगवंतासमोर मोह
राहणें शक्य नाहीं. त्यांत त्यानें आई
प्रमाणें उपदेश दिला.
दृष्टांत—
१ सूर्यानें अंधार गेल्याचा प्रश्न विचारणें.

= प्रश्न विचारला च म्हणून
प्रश्नाचें उत्तर —
१ भगवत्प्रसाद = कृतकृत्यता

V स्मृति – भगवत्स्वरुप ज्ञानाची

:: मोह = " मी अर्जुन " ही भ्रांति

(२) त्वत्प्रसादात् स्मृतिर्लब्धाऽस्थितोऽस्मि
गतसंदेहः १५६५–१५६७

× गतसंदेह = कर्माकर्माविषयीं संदेह

+ गतसंदेहत्वकारण – द्वैतनाश

V त्वत्प्रसादात् स्मृतिर्लब्धा

स्मृति = आत्मस्वरूप

:: स्थितः अस्मि — कर्म मुळीं च नाहीं
अशी स्थिति.

( ३ ) करिष्ये वचनं तव　　　१५६७–१५७५

× वचनं = आज्ञा

+ कारण — श्रीकृष्ण सेवायोग्य गुरु
दैवत.

V गुरुदैवतवर्णन —

१ ज्यामुळें द्वैतनाश

२ ज्याचा सर्वत्र निवास

३ ज्याच्या संबंधानें सर्वबंधनाश

४ ज्याच्या आशेनें इतर आशा नष्ट

५ जो भक्ताला आपलें स्वरूप
देतो. दृष्टांत — नदी — सागर

६ प्रत्यक्ष अर्जुनावर झालेला
गुरुपकार—
ब्रह्मस्वरूपसाक्षात्कार
व श्रीकृष्णार्जुन अभेद

( ४ ) अर्जुनवचनानें श्रीकृष्णहर्ष　१५७६–१५७७

१ हर्षोद्गार—
अर्जुनरूपानें विश्वफळाचें च
फळ मिळाल्याचें श्रीकृष्णवचन

२ हर्षदृष्टांत—
पूर्ण चंद्र पाहून समुद्राची भरती

( ५ ) श्रीकृष्णार्जुनसंवादानें संजयहर्ष
( पुढील श्लोकप्रस्ताव )　१५७८–१५८६

× व्यासप्रसादामुळें, युद्धाच्या विषम

काळीं हि धृतराष्ट्र व स्वतः
संजयाचें भाग्य.
१ धृतराष्ट्र भाग्य– व्यवहारांत अंध
तरी ज्ञानव्यवहारपात्र.
संजय भाग्य – घोड्याचा परीक्षक
तो ज्ञानाला पात्र.

∠ धृतराष्ट्राला संजयहर्ष मानवत
नाहीं. तेव्हां त्याला सोडून पुढें
संजयहर्षोद्गार ( पुढील श्लोकीं )

---

श्लोक ७४— ( १ ) श्लो. पूर्वार्ध + संवादमिममश्रौषं अद्भुतं
१५८७–१५९१

× मुळांतच कृष्णार्जुनभेद नाहीं सारखा च
दृष्टांत – पूर्वापरसागर.

∠ संवादामुळें पूर्ण अभेद म्हणजे
द्वैतभाव राखून संभाषण
करीत असतां हि द्वैतपणा नाहींसा.
ही संवादांतली अद्भुतता.

V परस्पर अभेद म्हणजे स्वतःसह
दुसऱ्याला आपणांत पाहणें.
दृष्टांत —
दोन समोरासमोरील आरशासारख्या
स्वच्छ वस्तु. अशीच कृष्णार्जुनस्थिति.

V या ऐक्यस्थितिमुळें शेवटीं
संवादसमाप्ति

∠ ऐक्यस्थितिमुळें गुरुशिष्य कोण
हें हि ओळखणें अशक्य.

दृष्टांत —
१ समोरासमोरचे आरसे
२ दोन दिवे
३ सूर्यापुढें सूर्य
( २ ) रोमहर्षणम्  १६००-१६०६
× संजयाची कृष्णार्जुनैक्यामुळें विरघळलेली
लीन झालेली अवस्था.
दृष्टांत—
१ दोन मिळत्या लोंढ्यांत सांपडलेलें मीठ
ही लीन अवस्था म्ह. हर्षादि सात्विक अवस्था
वर्णन--
१ देहविस्मृति
२ रोमांच
३ शरीरसंकोच
४ स्तंभखेदकंप अश्रु
५ गद्गदावस्था
६ श्वासाच्या धावेंत शब्दार्थांची गुंतागुंत
७ बोबडी इ. इ. इ.
( ३ ) पुन्हा संजय देहभानावर १६०७
( पुढील श्लोक कथनार्थ )
× कारण सुखाचें आपोआप
शयन

---

श्लोक ७५— ( १ ) संबंध श्लोक  १६०८–१६१२
× व्यासप्रसादात् – अर्जुनाला निमित्त
करून केलेल्या भाषणाला पात्रत्व
हा व्यासप्रसाद. तो अवर्णनीय.
१६११–१६१२

L श्रुतवान् – ऐकून ब्रह्मतद्रूपता
व द्वैतानिरास. १६०८–१६०९
( म्हणजे श्रवण आणि श्रवण
फळप्राप्ति )

T एतत् परं गुह्य – उपनिषदांना
हि माहित नसलेलें ज्ञान म्हणून
परम गुह्य १६०८

V योगेश्वर कृष्ण – समस्त
योगमार्ग जेथें कुंठित होतात १६१०

---

श्लोक ७६— ( १ ) श्लो० पूर्वार्ध = संवादस्मरण
राया म्हणून एकदम विस्मयावस्था
दृष्टांत—
रत्न रत्नप्रभावेष्टित.

X श्लो. पूर्वार्ध = संवादस्मरण
श्लो० उत्तरार्ध = हर्षावस्था
( देहभाननष्टता )

V संवादस्मरण झालें कीं हर्ष
म्ह. देहभान नष्टता. देहभान
आलें कीं संवादस्मरण. पुन्हां
लगे च हर्ष
दृष्टांत – हिमालयावरचीं सरोवरें
चंद्रोदयीं स्फटिक
सूर्योदयीं द्रवरूप १६१३–१६१५

---

श्लोक ७७— ( १ ) संजयाची धृतराष्ट्राच्या मूक ( जड )
अवस्थेला पाहून पृच्छा १६१६

( १ ) श्लो. पूर्वार्ध १६१७

× विश्वरुपस्मरणद्वारें
विश्वरुप निदर्शन –
१ न पाहतांच दिसतें
२ नाहींपणानें असतें
३ विसरुन हि आठवतें

( २ ) श्लो. उत्तरार्ध १६१८

× विश्वरुप + ज्ञानसंवाद
दोहोमुळें संजय देहभान
नष्टता. ( हृष्यामि च. )

( ३ ) संजयाची विलक्षण
अवस्था रुपकानें प्रत्यक्ष– १६१९–१६२०
कृष्णार्जुनसंवाद– तीर्थ
अहंता– स्नान करून दिलेली तिळांजली
१ आनंदानें गहिंवर
२ पुटपुटणें
३ श्रीकृष्ण श्रीकृष्ण म्हणणें

( ४ ) संजय धृतराष्ट्राला पाहून
अवस्था आवरतो. १६२१–१६२२

( ५ ) धृतराष्ट्राचा संजयाला ज्ञानचर्चेबद्दल
दोष १६२३–१६२४

× व्यासांनीं यासाठीं बसवलें काय
अशी तंबी.

( ६ ) धृतराष्ट्र दोष देणें
स्वाभाविक १६२५–१६२६

× कारण त्याला त्याची गोडी नाहीं

त्याला तें वेचव. दृष्टांत—

१ रानवटाला राजमंदिर

२ निशाचराला दिवस

( ७ ) धृतराष्ट्रांचा विजयासंबंधीं
प्रश्न १६२७–१६३०

( पुढील श्लोकप्रस्ताव )

× जयासंबंधीं धृतराष्ट्र मतजय दुर्योधनाला.
कारण दुर्योधन पराक्रमी व त्याचें
सैन्य अधिक.

\+ संजयाला ' तुझें ज्योतिष ' काय
असा थोडा तिरस्कारानें प्रश्न.

---

श्लो. ७८ — ( १ ) यत्र योगेश्वरः कृष्णः तत्र श्रीः १६३१–१६३८

× धृतराष्ट्राला संजयोत्तर ' मला
पुढील भविष्य समजत नाहीं. ' १६३१
( पण नित्यसिद्धांत समजतो
हा सांगण्याचा मतलब )

∠ जेथें कृष्ण तेथें लक्ष्मी, दृष्टांत—

| | | | |
|---|---|---|---|
| १ आयुष्य | तेथें | जगणें | |
| २ चंद्र | ,, | चंद्रिका | |
| ३ शंभु | ,, | अंबिका | |
| ४ संत | ,, | विवेक | |
| ५ राजा | ,, | सैन्य | |
| ६ सौजन्य | ,, | सोयरिक | |
| ७ विस्तव | ,, | दाहकशक्ति | |
| ८ दया | ,, | धर्म | } माला |
| ९ धर्म | ,, | सुखलाभ | |
| १० सुख | ,, | पुरुषोत्तम | |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ वसंत | ,, | वन | माळा |
| १२ वन | ,, | सुमन | |
| १३ सुमन | ,, | भृंगसंघ | |
| १४ गुरु | ,, | ज्ञान | ,, |
| १५ ज्ञान | ,, | आत्मदर्शन | |
| १६ आत्मदर्शन | ,, | समाधान | |
| १७ भाग्य | ,, | विलास | |
| १८ सुख | ,, | उल्लास | |
| १९ सूर्य | ,, | प्रकाश | |

( २ ) यत्र योगेश्वरः यत्र श्रीः
तत्र विजयः १६३९–१६४०

× लक्ष्मी — सिध्दिस्वरुप

= श्रीकृष्ण — विजयस्वरुप

( ३ ) यत्र पार्थः श्रीकृष्णः
तत्र श्रीर्विजयः } १६४१–१६५४

× ज्यांना श्रीकृष्ण लक्ष्मी सारखे
मायबाप त्यांना विजय कां मिळणार
नाहीं. प्रश्नरुप दृष्टांत— १६४१–१६४७

१ तेथील झाडें हि कल्पतरु

२ तेथील धोंडे ,, चिंतामणि

३ ,, गांवनदी ,, अमृतयुक्त

४ ,, – शब्द ,, वेद

५ तो पुरुष देहधारी सच्चिदानंद

= श्रीकृष्णलक्ष्मी जेथें तेथें स्वर्गमोक्ष

V जेथें श्रीकृष्ण तेथें सर्व प्रकारच्या सिद्धि

* जेथें श्रीकृष्णगुरु व अर्जुनाशिष्य
तेथें विजय १६४८–१६५४

१ श्रीकृष्णापेक्षां हि अर्जुन विजोयो-
पयोगी. दृष्टांत—
समुद्रापेक्षां तदुद्भव
मेघ उपयोगी.
लोखंडाला सोनें करणाऱ्या
परिसापेक्षां सोनें उपयोगी.
२ गुरुत्वाला यांत कमीपणा नाहीं
गुरु शिष्यद्वारें प्रकट होतो.
( खुद ज्ञानदेवांचें हि असें च
नाहीं कां ? )
दृष्टांत —
अग्नि दिव्याच्या द्वारें
मुलगा वरचढ व्हावा
ही बापाची इच्छा
श्रीकृष्णांत सफळ.
जेथें श्रीकृष्णार्जुन गुरुशिष्य
तेथें विजय नसेल तर विजय
च निरर्थक ठरेल.
V ( तात्पर्य कृष्णलक्ष्मी मायबाप
व कृष्णार्जुन गुरुशिष्य तेथें विजय )
× धनुर्धर विशेषण, विजयाबरोबर
वरील भूति, ध्रुवानिति, यांना
विवेचनांत गौणता दिली आहे.
( ४ ) प्रतिज्ञापूर्वक पुन्हां सर्व श्लोक-
तात्पर्य १६५५–१६५८

१ सर्व श्लोक षोडकयांत १६५५

V मूर्तिः, ध्रुवानिति = अभ्युदय

\+ श्री तेथें श्रीकृष्ण मुळाच्या उकळ रचना.

२ व्यासांच्या साक्षीसकळ

स्ववचनांची निश्चितता १६५६

∠ ३ पुन्हां सर्व श्लोक १६५७

४ बाहू उभारुन हें वचन

खोटें झाल्यास व्यासशिष्य

नव्हे असा संजयप्रतिज्ञाघोष १६५८

( ५ ) संजयकृत अंतिम श्लोकगौरव १६५९-१६६३

× अनंत शब्दब्रह्म – सवालाख

भारतांत भारतसार – ७००

श्लोकीं गर्तेत

गीतासार – संजयाच्या

अंतिम एका श्लोकांत.

\+ दृष्टांत – अग्नीचा अपरंपार विस्तार.

पण सूर्यास्तानें झालेला हानि

भरून काढण्यास तो केवळ

वातीच्या टोकावर

∠ या एका च श्लोकनिष्ठेची फलश्रुति.

---

उपसंहार १६६४–१८१०

---

( १ ) गीतासप्तशत श्लोक गौरव

निदर्शन १६६४–१६७६

× १४ कल्पना –

१ ७०० श्लोक = गीतेची पावलें

२ ७०० श्लोक = गीताकाशपरमामृत
३ ,, ,, = सप्तशतीवर्णित भगवती
४ ,, ,, = अंधकार नाशक अपर सूर्य.
५ ,, ,, = द्राक्षलता
६ ,, ,, = कमलयुक्त श्रीकृष्ण मुखपुष्करिणी
७ ,, ,, = गीता महिमामाळ
८ ,, ,, = वेदवृंद आवार
९ ,, ,, = आत्मापाचि आलिंगनार्थ बाहु
१० ,, ,, = गीता कमळभृंग
११ ,, ,, = गीता सागर तरंग
१२ ,, ,, = गीता रथतुरंग
१३ ,, ,, = सिंहस्थामुळें गीतागंगेंत सर्व तीर्थें
१४ ,, ,, = कल्पवृक्ष रांग
१५ ,, ,, = चिंतामणीची रांग

( २ ) या सातशें श्लोकांत श्रेष्ठ कनिष्ठ, पहिले शेवटचे, असें ठरवितां येत नाहीं. १६७७–१६८१

× दृष्टांत–
१ कामधेनू दुभती भाकड भेद नाहीं.
२ दिव्याला मागें पुढें ,, ,,
३ सूर्याला लहान मोठा ,, ,,
४ अमृताला खोल उथळ ,, ,,

= कारण भेद करण्याला गीतेंत वाच्य वाचक भेद नाहीं.

---

( ३ ) गीताशास्त्रांत वाच्य वाचक
एक श्रीकृष्ण १६८२–१६८४

× दाखला—
म्हणून— अर्थ किंवा पाठ
दोहोंनीं गीतेंत रुपलाभ

\+ तात्पर्य. गीता प्रभूची वाङ्मयमूर्ति.

ऽ यापुढें व्याख्यान विषय संपला.

( ४ ) गीता व इतर शास्त्र तुलना १६८५

× इतर शास्त्रें अर्थ प्रकट करून लुप्त.
गीता अविनाशी ब्रह्म.

( ५ ) गीता अर्जुन निमित्तानें विश्वावर
करुणा करण्यासाठीं १६८६–१६८९

दृष्टांत—
१ चंद्र चकोरनिमित्तानें त्रिभुवनदाह नाशी
२ गंगा गौतमऋषिनिमित्तानें त्रिभुवन
दाह नाशी.
३ अर्जुन वासरु तन्निमित्तानें जगाला
दुभतें

( ६ ) गीतेनें प्राप्त थोर फळ व गीतेची
जाणल्यानेणल्याविषयीं समान उदारदृष्टि
१६९०–१६९५

× फळ—
१ गीतामग्नता – कैवल्यस्थिति.
२ ,, पठन – परीसस्पर्शवत्-
ब्रह्मैक्यपुष्टि
३ ,, श्रवण– ,,

÷ समान उदार दृष्टि दृष्टांत—
द्रव्यसंपन्न उदार मनुष्य
कोणाला हि नकार देत नाहीं.

( ७ ) व्यासांनीं कृष्णार्जुनसंवाद सर्वांना
आकलनीय व सुंदर असा अनुष्टुभ
छंदांत व ७०० श्लोकांत तयार करून
सर्वांवर अपूर्व उपकार केला १६९६–१७०७

× आकलनीयतेला दृष्टांत—
१ आईचें मुलाला घास करून देणें
२ पंख्यानें सोसेल इतकाच वारा घेणें

= आकलनीयतेला व सुंदरतेला
दृष्टांत—
१ स्वातींच्या पाण्याचीं मोत्यें
२ वाद्यांत नाद
३ फुलें
४ पक्वान्न
५ आरसा

* व्यासांचा अपूर्व उपकार
१ असंख्यात वस्तु ७०० च्या
आटोक्यांत आणली.
दृष्टांत— समुद्र – मेघ
२ वाचेला जें असाध्य तें च
शब्दांत समावलें

( ८ ) व्यास व भाष्यकारांनुरोधानें हा ग्रंथ
मराठींत आणला यांत अनुचित कांहीं नाहीं

हें नम्रतेनें दृष्टांतपूर्वक कथन

१७०८-१७२२

\+ स्वकृतीविषयीं नम्रता—

व्यासमति चाचपडते तेथें

केवळ वाचाळता.

\+ येथें अनुचितता नाहीं. याचें कारण

गीतेची उदार दृष्टि —

दृष्टांत—

१ व्यासोक्ति सुमनमाळा

माझ्या दूर्वा

२ क्षीरसागरीं हत्तींचें कळप मच्छर

३ गरूडाची आकाशांत भरारी

पाखराचें उडणें

४ राजहंसाचें डौलदार चालणें

इतराचें चालणें.

५ दिवटी

लहान वात

६ समुद्रांतलें आकाश प्रतिबिंब

डबक्यांतलें ,, ,,

७ समुद्रांतलीं प्रचंड जलचरें

लहान मासोळी

८ सूर्याजवळील अरुण

पृथ्वीवरील मुंगी

V नम्रतेनें कथन. अयोग्यता असून

हि योग्य ठिकाणीं पोंचण्याचा

विश्वास कारणें

१ व्यासामार्गें चाळणें दृष्टांत
बाप - मुलगा
२ गीताभाष्यकारांस वाट
पुसणें
(९) समर्थ श्रीसद्गुरुनिवृत्ति
नाथांचें सामर्थ्य असल्यामुळें
हा ग्रंथ मराठींत सर्वांस
सुलभ झाला यांत आश्चर्य
हि कांहीं नाहीं. १७२३-१७३५

× विश्वांतले सर्व गुण गुरुंमुळें
( ज्ञानेश्वरांना सर्व सृष्टि गुरु-
रुप झाली होती. ) १७२३-१७२७
१ पृथ्वी — क्षमा
२ चंद्र — तापनिवारण
३ सूर्य — तेज
इ. इ. इ.

\+ गुरुसामर्थ्यानें सामान्यांत हि
असामान्य गुण दाखवले
१ एकलव्य
२ वसिष्ठच्छाटी
३ चंदनवदवासी सामान्य झाडें
जडांत गुरुंमुळें अद्भुत सामर्थ्य
ज्ञानदेव चित्तयुक्त ( सचेतन ) मग
गुरुकृपेनें काय होणार नाहीं.
दृष्टांत— १ सूर्य — डोळस

\+ म्हणोनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्वासही

प्रबंध होआवे । —गुरुकृपेनें
आत्मविश्वासाचें उत्तम निदर्शन.

( १० ) प्रस्तुत ग्रंथवाचन पद्धति १७३५–१७४१

\+ १ सुंदर तऱ्हेनें गाऊन
२ सरळ गद्य स्वरूपांत— कसेंहि

V वाचलें तरी उणेपणा नाहीं. ( म्हणजे
गाण्याला लायक न गाइला तरी
हि रंग भरेल अशी ग्रंथ रचना )

दृष्टांत—
१ अंगावर घातलेला दागिना सुरेख
,, न ,, ,, हि ,,
२ सोन्यांत बसविलेले मोती खुलतात
मोकळे मोती हि ,,
३ बटमोगऱ्याच्या फुलांच्या माळांत
सुवास तो च मोकळ्या फुलांत

\+ तात्पर्य — हा ग्रंथ म्हणजे एक नाना
रागांच्या अतिमधुर गायनासारखा
स्वतःसिद्ध रसमय आहे
मग तो कसा हि वाचा.

( ११ ) हा ग्रंथ हें निवृत्तिनाथांच्या कृपेचें वैभव.
त्यामुळें यांत अद्भुत गुण १७४२–१७५०

अद्भुत गुणः—
१ आबाल सुबोधता
२ ब्रह्मरसमयता
३ सहज कानावर पडल्यानें
समाधि सहजता दृष्टांत—

चंदनपरिमळार्थ चंदनफुलांची
जरूर नाहीं.
४ नीटपणें श्रवण केल्यास व्यसना-
इतकी त्याची पकड
५ पाठानें पांडित्य — अमृताक्षः
दूर सारणारें
६ यांतील काव्यानें अपूर्व शांति.
तुलना —
मनन निदिध्यसनाला मागें
टाकणारी ( म्हणजे मनन
निदिध्यसनांतील शांतीला
मागें टाकणारी )
७ श्रवणानें ब्रह्मानंदाबरोबर सर्वेंद्रियांवर
ब्रह्मानंदाची पुष्टी ( छाप )
८ अनधिकाऱ्यालाहि बाह्य वाक्चातुर्यानें
सुखलाभ
( या अध्यात्मशास्त्रांत अंतरंगांत
शिरणारा च अधिकारी दृष्टांत —
चंद्राचें चांदणें चकोराला उपभोग्य
तरी इतरांना त्यामुळें सौख्य
+ या ग्रंथाचा छंद ओवी.
( १२ ) या ग्रंथापाठीमागची ज्ञान परंपरा भूमिका
( गुरुपरंपरा कथन )
व ग्रंथद्वारें ज्ञानदेव निमित्त करून
गुरुंकडून जगाचे रक्षण १७५१–१७६५

\+ गुरुपरंपरा--




|=| गुरुपदेशप्रसंगस्थानादि
वर्णन —

१ शंकरपार्वतींचा संवाद क्षीर -
सिंधूजवळ पुरातन काळीं

२ त्या संवादांतून मकरादेशांतील
मत्स्येंद्रनाथांस सहज उपदेश लाभ

३ स्वतः समाधि घेण्याच्या उद्देशानें
म्ह० परंपरा पुढें टिकावी म्हणून
' योगप्रवीण ' ' विरक्त ' गोरक्षनाथांस
त्यांच्याकडून ( = सप्तश्रृंगीवर ? )

४ गोरक्षांनीं गैनीनाथांस उपदेश

५ गैनीनाथांकडून निवृत्तिनाथांना
उपदेश – हेतु – कलिकालग्रस्त
जगाचा निवृत्तींनीं बचाव करावा.

६ निवृत्तिनाथांनीं जो ज्ञानवर्षाव केला
तो च हा ग्रंथ. ज्ञानदेव तेथें चातक

\+ स्वतःला उपदेश दिला असें

ज्ञानदेव म्हणत नाहींत ही विनयशीलता.

V हा ग्रंथ हें गुरुपरंपरेचें समाधि धन

L ग्रंथरचनेला अयोग्य. तरी ज्ञानदेवांना
निमित्त करून निवृत्तिनाथांनीं
जगाचें रक्षण केलें.

( १३ ) ग्रंथांत अधिक उणें असल्यास
क्षमायाचना. विशेषत्वानें क्षमा
याचनेची अनवश्यकता १७६६-१७७१

× क्षमायाचनाकारण—
ग्रंथरचनेचें स्वतःचें अज्ञान

|-| विशेषत्वानें क्षमायाचनेची
अनवश्यकता कारणें—

१ हा ग्रंथ गुरुंनीं च केला
ज्ञानदेव निमित्त दृष्टांत— कळसूत्री बाहुलें

२ हा ग्रंथ संतसभेसमक्ष
झाला. त्यामुळें हीतगुण मनुष्य पूर्णगुण
न झाल्यास दोष संतसभेचा. दृष्टांत—

१ परिस -- लोखंड
२ ओढा — गंगा

( १४ ) संतांजवळ येण्याचें भाग्य गुरुंनीं
दिल्यामुळें संतांकडून अपूर्व ग्रंथरचना
पूर्ण झाल्याबद्दल धन्यता १७७२-१७९२

× अपूर्व ग्रंथरचना याचें कारण
गीतार्थ प्रकट करणें दुष्कर.
तुलनेनें—

१ सोन्याचा भूगोल
२ चिंतामणीचे मेरुसारखे पर्वत
३ साती समुद्र अमृतरसयुक्त
४ चांदण्यांचे चंद्र
५ कल्पवृक्षांच्या बागा
— करणें सुकर

* संतकृपेमुळें च प्रस्तुत अपूर्व कार्य झालें.
संतकृपेमुळें कारण—
ज्ञानदेव मूक.
प्रस्तुत कार्य—
१ अफाट ग्रंथसागरतरण
२ कीर्तिविजयध्वज
३ मेरुवद्गीतामंदिररचना
व त्यांत गुरुमूर्ति
प्रतिष्ठापना व पूजा
४ ज्ञानदेवाची गीता आईशीं गांठ.

V अपूर्वग्रंथरचना व धन्यता—
धन्यता—
जन्मसाफल्य
सुखलाभ
ग्रंथापूर्वता तुलनेनें —
१ विश्वामित्र सृष्टीपेक्षा ग्रंथसृष्टि
श्रेष्ठ. कारण
विश्वामित्र सृष्टि नाशवंत

२ उपमन्यूला क्षीरसागर दिला तो हि
ग्रंथाशी बरोबरी करीत नाहीं.
कारण त्यांत हालहल निघालें

३ येथें सूर्य हि उणा कारण
उष्णता प्रखर

४ चंद्र शीतल पण कलंकदोष.

— तात्पर्य हा ग्रंथ– अव्यय, निर्दोष
प्रकाशदायक, शीतळ, निष्कलंक
असा अनुपम.

( १५ ) ईश्वरापाशीं या वाङ्मययज्ञाबद्दल
प्रसादाची मागणी व ईश्वराकडून
तत्पूर्ति ( भरतवाक्य ) १७९३–१८०१

× प्रसाददशक—

१ दुष्टांचें दुष्टपण मोडो
२ दुष्टांचें सत्कर्मप्रेम वाढो
३ सर्व भूतांची मैत्री होवो
४ पापांधकार जावो
५ स्वधर्मसूर्यानें विश्व उजळो
६ प्राणिमात्राची इच्छापूर्ति होवो
७ भूतमात्रांना संतांची अखंड संगति लाभो
८ त्रिभुवनें सुखी होवोत
९ सर्व ईश्वरभजनीं लागोत
१० या ग्रंथावर ज्यांचें जीवन त्यांना
इहपरलोकीं सुखलाभ होवो

× मुद्दाम प्रचारकार्यप्रार्थना

+ भरतवाक्यांतर्गत संतवर्णन—

१ मंगळता वर्षाव करणारे

२ चालते कल्पवृक्ष

३ चैतन्यचिंतामणिग्राम

४ अमृताचे बोलते सागर

५ कलंकहीन चंद्र

६ तापहीन सूर्य

( १६ ) ग्रंथलेखनस्थळ, काळ, ग्रंथकर्ता, ग्रंथस्वरूप, ग्रंथभाषा १८०२–१८०५

स्थळ– महाराष्ट्र
गोदावरी दक्षिणतीर
मोहिनीराज वास्तव्यक्षेत्र ( नेवासें )

काळ– १ राजा रामदेवराव जाधव
राज्य करीत असतां ( रामदेवराव
योग्यता– १ न्यायानें राज्य
२ कलाप्रियता )

ग्रंथकर्ता– शंकरपरंपरेंतील निवृत्तिशिष्य
ज्ञानदेव ( शंकर म्ह०
शंकराचार्य नव्हे. श्रीशंभू )

ग्रंथस्वरूप– ग्रंथ हा लेण्यासारखा.
( लेणें म्ह. अलंकार नव्हे.
वेरूळ, अजिंठा इ. प्रमाणें लेणें )

ग्रंथभाषा– देशभाषा = मराठी

( १७ ) १८ व्या अध्यायाच्या उपसंहार निमित्तानें गीताग्रंथस्थान व गौरव १८०६–१८०८

× एका तऱ्हेनें या ओव्या
इति श्रीमद्भगवद्गीतासु
ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे चा पर्याय दिसतो.

+ अठरावा अध्याय
गीताकळश.

(१८) शेवटची इच्छा १८०९

× सर्वत्रः सुखीनः संतु
या श्लोकाचा ही ओवी
संक्षेप दिसतो.

(१९) ग्रंथलेखनशाक व
ग्रंथलेखकनाम १८१०
शक १२७२
लेखक– सच्चिदानंदबाबा.